श्रीमच्छंकराचार्यप्रणीता

# शतश्लोकी

( सान्वयार्थ-विवरण )

लेखक—विष्णु वामन बापटशास्त्री

किंमत १ रुपया.

ॐ

श्रीमच्छंकराचार्यप्रणीता

# शतश्लोकी

( सान्वयार्थ-विवरण )



लेखक व प्रकाशक

विष्णु वामन बापटशास्त्री.

आवृत्ति तिसरी.



कार्तिक वद्य पंचमी, शके १८५४.



१८-११-३२

किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्यांचा शतश्लोकी या नांवाचा हा सुप्रसिद्ध ग्रंथ अन्वयार्थ व विवरण यांसह आम्हीं दहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला होता. तीं दुसरी आवृत्ति खलास झाल्यामुळें आज ही तिसरी आवृत्ति आचार्यांच्याच कृपेने आम्ही प्रसिद्ध करीत आहों. दुसऱ्या आवृत्तींत राहिलेले दोष काढून मूळ श्लोकार्थ व भावार्थ समजण्यास अत्यंत अवश्य अशा सुधारणा या आवृत्तींत केल्यामुळें ती अधिक लोकोपयोगी होईल, अशी आम्हांस आशा आहे. ही आवृत्ति आचार्यकुलासाठीं प्रसिद्ध केली आहे. अर्थात् तिचा फायदा त्या संस्थेस मिळणार आहे. म्हणून आम्हीं तिची पूर्वीचीच किंमत कायम ठेवली आहे. त्यावरून असले ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत स्वतःच्या फायद्यापेक्षां लोकोपयोगाकडे आमची दृष्टि अधिक असते, हें सहज लक्षांत येईल. सामान्य वाचकास संस्कृत टीकेचा उपयोग नसल्यामुळे या आवृत्तींतहि ती गाळली आहे. तत्त्वजिज्ञासु आचार्यभक्तांनीं या ग्रंथाचा अभ्यास करून कृतार्थ व्हावें, अशी आमची श्रीचरणीं नम्र प्रार्थना आहे.

कार्तिक कृष्ण पंचमी १८५४
पुणें शहर.

आचार्यभक्त,
वि. वा. बापट.

# अनुक्रमणिका.

# आचार्यकुलाला अर्पण केलेल्या पुस्तकांची यादी.

१. **शांकरभाष्यानुसार सुबोध गीता**—( आवृत्ति दुसरी ) [ अवतरण, मूळ श्लोक, अन्वय, सरळ सुबोध अर्थ, स्पष्टीकरण व उपोद्घात यांसह ] पृ. ३४४, किमत कागदी बाइंडिंग १॥ रु. कापडी बा. १॥। रु.

२. **शांकरभाष्यानुसार सुबोध उपनिषत्संग्रह**—[ मूळ श्रुति, अन्वयार्थ, स्पष्टीकरण, प्रत्येक उपनिषदाचे सिंहावलोकन, यांसह ] ईश-केन-कठ-प्रश्न-मुंडक-मांडूक्य-तैत्तिरीय-ऐतरेय-छान्दोग्य-बृहदारण्यक-कौषीतकि-श्वेताश्वतर-जाबाल—अर्थात् ब्रह्मसूत्रांत ज्यांचा विचार केला आहे, अशीं महत्त्वाचीं तेरा उपनिषदे, प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका पृ. ८८० किं. रु. ५॥

३ **शांकरभाष्यानुसार सुबोध ब्रह्मसूत्र**—[वैयासिकन्यायमालेसह ] प्रत्येक अधिकरणाचे नांव-सूत्रे-सूत्रार्थ-विषय-संगति-सिद्धान्त, वैयासिकन्यायमालेचे श्लोक-अन्वयार्थ, प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका, यांसह. पृ. ५६० किं. रु. ३.

४. **सुबोध पंचदशी**—[ मूळ-अन्वयार्थ-स्पष्टीकरण प्रत्येक प्रकरणाचा मथितार्थ, प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका, सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी यांचें चरित्र यांसह ] पृ. ७५० किंमत पातळ प्रत रु. ३॥ जाड प्रत रु. ४.

## सभाष्य-भाष्यार्थ संपूर्ण वेदान्तप्रस्थानत्रय.

१. **श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ**—[ मूळ श्लोक, अन्वयार्थ, शांकरभाष्य, भाष्याचा सरळ व सुबोध अन्वयासह अर्थ, गीतारहस्यपरीक्षणात्मक विस्तृत टीपा, प्रस्तावना, सविस्तर विषयानुक्रमणिका, वादग्रस्त व अनेकार्थी शब्दांचा कोश, १ श्रीशंकराचार्य, २ शरीररूपी रथ, ३ चतुर्भुज श्रीकृष्ण, अशीं तीन सुंदर चित्रें व सर विठ्ठलदास दा. ठाकरसी यांचा फोटो, यांसह [ पृष्ठें १३४०. उत्तम ग्लेज कागदाची एका भागांत उत्तम बाइंडिंगची प्रत किं. रु. ७॥.

२. **दशोपनिषद्भाष्यार्थ**—ईश ८६, केन ८८, काठक ८१२, प्रश्न ८१०, मुंडक ८८, गौडपादीय कारिकांसह मांडूक्य २॥ रु. ( छापत आहे ) तैत्तिरीय १॥, ऐतरेय १॥, छान्दोग्य ४॥, बृहदारण्यक ७॥ [ या दहा उपनिषदांचा—मूळ श्रुति, अर्थ, शांकरभाष्य व त्याचा सरळ स्पष्टीकरणासह अर्थ, यांसह ]

३. **ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ**—अध्याय १–४. भाग तीन. पूर्वोक्तप्रमाणेंच पृष्ठें १९०० हून अधिक. किं. १५ रु.

श्रीः

श्रीमच्छंकराचार्यप्रणीता

# शतश्लोकी.

सान्वयार्था महाराष्ट्रविवरणसमेता च ।

दृष्टान्तो नैव दृष्टस्त्रिभुवनजठरे सद्गुरोर्ज्ञानदातुः
स्पर्शश्चेत्तत्र कल्प्यः स नयति यदहो स्वर्णतामश्मसारम् ।
न स्पर्शत्वं तथापि श्रितचरणयुगे सद्गुरुः स्वीयशिष्ये
स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमस्तेन वाऽलौकिकोऽपि १

**अन्वयार्थ**—' त्रिभुवनजठरे ज्ञानदातु सद्गुरोः दृष्टान्तः नैव दृष्टः '—या त्रिभुवनांत ज्ञानदात्या गुरूना ( शोभेल असा ) दृष्टान्तच मिळत नाही. ' तत्र स्पर्शः कल्प्यः चेत् ( तथापि स न घटते ) '—त्याना परिसाची उपमा जर दिली, ( तर तीहि योग्य होत नाही. ) ' अहो यत् ( यद्यपि ) स अश्मसार स्वर्णतां नयति तथापि स्पर्शत्व न ( नयति ) '—कारण अहो जरी परिस लोखंडाला स्वर्णत्व–सुवर्णत्व देतो तरी परिसत्व देत नाही. ' सद्गुरु (तु ) श्रितचरणयुगे स्वीयशिष्ये स्वीय साम्य विधत्ते '–( परतु ) सद्गुरु चरणयुगुलाचा आश्रय करणाऱ्या आपल्या शिष्याला स्वतःचे साम्य देतात. ' तेन निरुपमः भवति '—आणि त्यामुळेच ते निरुपम आहेत. ' अलौकिकोऽपि वा ( दृष्टान्तः न दृष्टः ) '—अथवा ( त्याना योग्य असा ) प्रपचातीत ( अलौकिक ) दृष्टान्तहि मिळत नाही. [ परमपूज्य श्रीमज्जगद्गुरु आचार्य ह्या पहिल्या श्लोकांत प्रथमतः सद्गुरूची योग्यता व माहात्म्य सागतात. कारण " ज्याची देवाप्रमाणे गुरूवर परम भक्ति असेल त्यालाच तत्त्वप्रकाश होतो " ( श्वे. ६।२३ सु. उ. सग्रह पृ. ९३५. ) अशी श्रुति आहे. ज्ञानदान करणाऱ्या सदूगुरूंना

शोभेल असा दृष्टान्त ह्या त्रिभुवनामध्ये कोठेहि मिळत नाही. व्यावहारिक क्षुद्र विद्या शिकविणाऱ्या गुरूंना योग्य असा दृष्टान्त कदाचित् मिळू शकेल, परंतु प्रत्यक्ष भगवानानी " न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते "–( गी. भा. पृ. ४९८ ) ज्ञानासारखा पवित्र वस्तु या जगात नाही, अशा प्रकारे ज्या ज्ञानाच्या पवित्रतेविषयी थोरवी वर्णिली आहे, त्या ज्ञानाचे दान करणाऱ्या सद्गुरूंना तर ह्या नाना चित्र-विचित्र वस्तूंनी भरलेल्या त्रिभुवनात एकहि दृष्टान्त आढळत नाही. आता कदाचित् परिस लोखंडाला सुवर्णता देतो, म्हणून त्याचा दृष्टान्त देऊ म्हटले, तर तोहि योग्य होत नाही. कारण परिस लोखंडाला जरी सुवर्णत्व म्हणजे पूर्व स्थितीपेक्षा उच्चत्व देतो, तरी आपले परिसत्व देत नाही. म्हणजे त्याचा अनुग्राह्य ( ज्याच्यावर अनुग्रह करावयाचा अशा ) वस्तूला स्वतःसारखे करिता येत नाही. पण सद्गुरूंच्या चरणद्वयाचा आश्रय करून रहाणाऱ्या शिष्याला सद्गुरु स्वसाम्य देतात, म्हणजे ते शिष्याला आपल्याप्रमाणेच धन्य करून सोडितात आणि म्हणूनच त्यांना नानाप्रकारच्या विचित्र वस्तूंनी भरलेल्या ह्या देवादि तिन्ही लोकांत योग्य अशी उपमा मिळत नाही. तसेच प्रपंचांतर्गत असाहि त्यांना योग्य दृष्टान्त मिळत नाही. कारण ते आत्मरूप झालेले असतात. भगवानानीहि " **ज्ञानी त्वात्मैव मे मतम्** "–ज्ञानी तर माझा आत्माच आहे, असे सांगितले आहे. सारांश सद्गुरूंच्या भक्तीवाचून व ते प्रसन्न होऊन त्यांचा अनुग्रह झाल्यावाचून कोणाहि साधकाला कृतार्थ होता येत नाही. गुरूला शरण गेल्याशिवाय व शरण गेल्यानंतरहि शिष्याचा अधिकार किती आहे, याविषयी त्यांचा निश्चय झाल्याशिवाय ते कधीहि तत्त्वाचा उपदेश करीत नाहीत पण त्यांनी एकदा तत्त्वोपदेश केला की तो शिष्यहि सद्गुरूंच्या योग्यतेचा होतो. तस्मात् गुरूपसदन, ( म्हणजे गुरूंना शरण जाणे ) गुरुसेवा व तद्द्वारा त्यांची प्रसन्नता, हीच परमपुरुषार्थप्राप्तीची उत्कृष्ट साधने आहेत. ] १.

**यद्वच्छ्रीखण्डवृक्षप्रसृतपरिमलेनाभितोऽन्येऽपि वृक्षाः**
**शश्वत्सौगन्ध्यभाजोऽप्यतनुतनुभृतां तापमुन्मूलयन्ति ।**
**आचार्याल्लब्धबोधा अपि विधिवशतः संनिधौ संस्थितानां**
**त्रेधा तापं च पापं सकरुणहृदयाः स्वोक्तिभिः क्षालयन्ति २**

**अन्वयार्थ**—' यद्वत् श्रीखण्डवृक्षप्रसृतपरिमलेन अभितः अन्ये अपि वृक्षाः

शश्वत् सौगन्ध्यभाज' ( भवन्ति ) '—ज्याप्रमाणे चंदनवृक्षापासून पसरलेल्या परिमलाने जवळ असलेले दुसरेहि वृक्ष निरंतर सुगंधयुक्त होतात; '( न केवल सौगन्ध्यभाज किंतु ) अतनुतनुभृतां तापं अपि उन्मूलयन्ति '—( इतकेच नव्हे तर ) पुष्कळ लोकांचा तापहि नाहींसा करितात. ' ( तद्वत् ) आचार्यात् विधिवशतः लब्धबोधा अपि सकरुणहृदयाः ( सन्तः ) स्वोक्तिभिः संनिधौ सुस्थितानां त्रेधा तापं च पापं क्षालयन्ति '—त्याचप्रमाणे दैवयोगाने आचार्यांपासून ज्यांना ज्ञान प्राप्त झालें आहे, असे पुरुषहि दयार्द्र अंतःकरणानें युक्त होत्साते स्वतःच्या वाणीनें आपला आश्रय करून रहाणाऱ्यांचे त्रिविध ताप व त्रिविध पापें नाहींशीं करितात. [ आतां ह्या दुसऱ्या श्लोकामध्ये केवळ श्रीगुरूच्या सांनिध्यानेंहि जर शिष्य कृतार्थ होतो, तर मग उपदेशानें होईलच हें काय सांगावें ' असें चंदनाचा दृष्टान्त देऊन आचार्य प्रतिपादन करितात—मलयगिरीवर सर्वच चंदनाचे वृक्ष नसतात. खरा चंदन कोठें एखादाच असतो. पण त्याच्यापासून सर्वत्र पसरणाऱ्या सुगंधानें आसपासचे दुसरे वृक्षहि निरंतर सुगंधयुक्त होतात. केवळ ते सुगंधयुक्त होतात इतकेंच नव्हे, तर सर्व जातीच्या अनंत प्राण्यांचे तापहि नाहींसे करितात. म्हणजे मुख्य चंदनाच्या छायेनें, सुगंधानें व उटीनें ज्याप्रमाणें उष्ण दिवसामध्यें प्राण्यांना आल्हाद वाटतो, तसेंच सांनिध्यानें चंदनत्वास प्राप्त झालेल्या ह्या वृक्षांची छाया, सुगंध व उटी यांच्या योगानेंहि सर्वांचे ताप नष्ट होतात. ह्या श्लोकांतील ' अतनु ' ह्या पदानें लोकांतील तारतम्यमात्र घालविलें आहे. म्हणजे ते वृक्ष प्राण्यांच्या जाति, वर्ण इत्यादिकांकडे न पाहतां सर्वांचें सारखें समाधान करितात, त्याचप्रमाणें दैववशात् आचार्यांपासून ज्यांना उपदेश मिळाला आहे असे दयार्द्र अंतःकरणाचे सत्पुरुष, कांहीं कर्मधर्मसंयोगानें आपला आश्रय करून रहाणाऱ्या साधकांचे आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक असे तीन ताप व कायिक, वाचिक आणि मानसिक अशीं तीन प्रकारचीं पापें ज्यांच्या त्यांच्या अधिकाराप्रमाणें कर्म, उपासना किंवा ज्ञान यांचा उपदेश करणाऱ्या स्वतःच्या वाणीनेंच नाहींशीं करितात. ' **विधिवशतः** ' या पदानें सद्गुरूपासून ज्ञानप्राप्ति होणें अत्यंत दुर्लभ आहे, हें सुचविलें आहे. ] २.

**आत्मानात्मप्रतीतिः प्रथममभिहिता सत्यमिथ्यात्वयोगाद्**
**द्वेधा ब्रह्मप्रतीतिर्निगमनिगदिता स्वानुभूत्योपपत्त्या ।**

**आद्या देहानुबन्धाद्भवति तदपरा सा च सर्वात्मकत्वाद्**
**आदौ ब्रह्माहमस्मीत्यनुभव उदिते खल्विदं ब्रह्म पश्चात् ३**

**अन्वयार्थ**—' प्रथमं सत्यमिथ्यात्वयोगात् आत्मानात्मप्रतीतिः अभिहिता'– प्रथमतः सत्यत्व आणि मिथ्यात्व याच्या योगाने आत्मा आणि अनात्मा यांचा अनुभव सांगितला आहे.–' स्वानुभूत्या उपपत्त्या ( च इति ) द्वेधा ब्रह्मप्रतीतिः निगमनिगदिता '–स्वतःच्या अनुभवाने व युक्तीने अशी दोन प्रकारांनीं ब्रह्म-प्रतीति येते, असे वेदामध्ये सांगितले आहे.–' आद्या ( या प्रतीतिः सा ) देहानुबन्धात् '–(त्यांतील) प्रथमतः जी प्रतीति येते ती देहाच्या योगानेच येते– ' तदपरा च ( या ) सा सर्वात्मकत्वात् भवति '–त्याचप्रमाणे दुसरी उपपत्तीनें जी प्रतीति येते, ती परमेश्वराच्या सर्वात्मकतेमुळे येते.–' आदौ ब्रह्माहमस्मि इति अनुभवे उदिते (सति) पश्चात् खलु इदं ब्रह्म (इति आत्मप्रतीतिः भवति)'– प्रथम ' मी ब्रह्म आहे, ' असा अनुभव आल्यानतर मग हे सर्व ब्रह्म आहे, असा अनुभव येतो. ( आत्म्याची प्रतीति कशी व केव्हां येते, हे ह्या श्लोकांत आचार्यांनी सांगितले आहे. प्रथमतः विचार करू लागले असतां सत्य व मिथ्या अशा दोन कोटी आपल्यापुढे उभ्या रहातात. यास्तव सत्यत्वाचे यो-गाने आत्म्याची प्रतीति व मिथ्यात्वाचे योगाने अनात्म्याची प्रतीति येते. "सत्यं ज्ञानमनन्त ब्रह्म " (तै. भा. पृ. ७० ) या श्रुतीप्रमाणे पाहिले असतां सत्य हे ज्ञान व मिथ्या हे तद्विपरीत अज्ञान होय. त्या सत्य–मिथ्यात्वाच्या योगाने सत्य म्हणजे आत्मा व मिथ्या म्हणजे तदितर सर्व जडवर्ग, अशी दोन प्रकारची प्रतीति प्रत्येक विचारवानाला प्रथमतः येते आणि असे ज्ञान झाले असतां ब्रह्माचा साक्षात्कारहि दोन प्रकारांनीं होतो; एक स्वतःच्या अनुभवाने व दुसरा युक्तीने. वेदांनींहि असेच सांगितले आहे. त्यांतील स्वानुभवसिद्ध अशी जी आद्य प्रतीति ती शरीरसंबंधाने म्हणजे स्थूलदेहापासून अंतःकरणापर्यंत सर्व कार्य-करणसंघात व आत्मा यांच्या अनुषगाने होते व दुसरी युक्तिद्वारा होणारी जी प्रतीति ती परमेश्वराच्या समष्टिरूपामुळे होते. सृष्टीतील प्रत्येक व्यक्ति ही व्यष्टि व त्या सर्व व्यक्तींचा समुदाय ही समष्टि. हिलाच सर्वज्ञ, परमेश्वर, हिरण्यगर्भ, सूत्रात्मा इत्यादि म्हणतात. ईश्वर सर्व चराचर पदार्थांचा समुदाय आहे. म्हणूनच तो सर्वात्मकहि आहे. अर्थात् माझ्यामध्ये जे तत्त्व आहे तेंच सर्वत्र आहे, अशा युक्तिद्वारा ही प्रतीति येते. तात्पर्य, पूर्वी देहद्वारा ' मी ब्रह्म आहे ', असा साक्षात्कार झाला असतां तदनंतर हें सर्वहि दृश्यजात

ब्रह्मच आहे असा युक्तिद्वारा ( अनुमानानेहि ) साक्षात्कार होतो. सारांश " एकमेवाद्वितीयं ब्रह्म " ( छां. भा. पृ. ४१९ ) असा साक्षात्कार होण्यापूर्वी ' मीच ब्रह्म आहे ' असा ह्या देहामध्येच अनुभव आला पाहिजे. ] ३.

**आत्मा चिद्वित्सुखात्माऽनुभवपरिचितः सर्वदेहादियन्ता**
**सत्येवं मूढबुद्धिर्भजति ननु जनोऽनित्यदेहात्मबुद्धिम् ।**
**बाह्येऽस्थिस्नायुमज्जापलरुधिरवसाचर्ममेदोयुगन्त-**
**र्विण्मूत्रश्लेष्मपूर्णं स्वपरवपुरहो संविदित्वापि भूयः ४**

**अन्वयार्थ**—' चिद्वित्सुखात्मा आत्मा अनुभवपरिचितः ( तथा ) सर्वदेहादियन्ता—आत्मा सच्चिदानन्दरूप आहे व त्याचा अनुभवाने परिचयहि झालेला आहे. तसाच, तो सर्व देहादिकाचा नियता आहे.—' ननु एव सति ( अपि ) मूढबुद्धिः जनः अनित्यदेहात्मबुद्धि भजति '—पण खरोखर असे आहे तरी मूढबुद्धि जन अनित्य जो देह त्याचे ठिकाणी आत्मबुद्धि ठेवतात.—'अहो स्वपरवपु. बाह्ये अस्थिस्नायुमज्जापलरुधिरवसाचर्ममेदोयुक् '—अहो पण, आपलें किंवा दुसऱ्याचे शरीर बाहेरून अस्थि, शिरा, मज्जा, मांस, रक्त, वसा, चर्म व मेद यानी युक्त आहे—' तथा अतः विण्मूत्रश्लेष्मपूर्ण '—आणि आत विष्ठा, मूत्र व श्लेष्मा यांनी भरलेले आहे;—' (इति) संविदित्वाऽपि भूयः ( देहात्मबुद्धि भजते इति महदाश्चर्य )'—हें जाणूनहि पुनः ते त्याचे ठिकाणी आत्मबुद्धि ठेवितात, हे केवढे आश्चर्य आहे ? [ याप्रमाणे आचार्यांनी पूर्वश्लोकांत नामनिर्देशाने दोन प्रकारची आत्मप्रतीति सांगितली. आतां पुढे " आत्मा चिद्वित्सुखात्मा " या श्लोकामध्ये तिचे पूर्वीपेक्षां अधिक निरूपण करितात. परमात्म्याचे सच्चिदान्दरूप केवल उपनिषद्वाक्यांवरूनच जाणतां येते असें नाहीं तर आपल्या नेहमींच्या अनुभवानेहि ते परिचित झालेले आहे. तो देह, इंद्रियें व प्राण यांचा चालक, भासक व नियामक आहे; तो देहाला क्रिया करण्याची शक्ति देतो, म्हणून चिद्रूप, इंद्रियांच्या द्वारा विषयोपभोग घेतो म्हणून ज्ञानरूप व निद्रावस्थेमध्यें केवल आनंदाचाच अनुभव घेतो, म्हणून आनंदरूप आहे. ह्याप्रमाणें तिन्ही अवस्थांमध्यें प्रत्येक प्राण्याला त्याचा अनुभव येतो. तथापि हा मूढ पुरुष ह्या अनित्य देहालाच आत्मा असे मानतो. पण तें अगदीं अयोग्य आहे. कारण बाह्य भागीं अस्थि, मांस, रक्त इत्यादिदिकांनीं व आंत विष्ठा—मूत्रादिकांनीं भरलेलें जें स्वतःचें किंवा दुसऱ्याचें शरीर

तें अत्यत अमगल व निद्य आहे, असे जाणून सुद्धां पुन: त्यालाच आत्मा समजून त्याची शुश्रूषा करणे हे केवढे आश्चर्य आहे ! ! सारांश निद्य शरीर व अत्यंत पवित्र आत्मा यांचे ऐक्य होणे त्रिकालीहि शक्य नाही. ] ४.

**देहस्त्रीपुत्रमित्रानुचरहयवृषास्तोषहेतुर्ममेत्थं**
**सर्वे स्वायुर्नयन्ति प्रथितमलममी मांसमीमांसयेह ।**
**एते जीवन्ति येन व्यवहृतिपटवो येन सौभाग्यभाज-**
**स्तं प्राणाधीशमन्तर्गतममृतममुं नैव मीमांसयन्ति ५**

**अन्वयार्थ**—' देहस्त्रीपुत्रमित्रानुचरहयवृषा मम तोषहेतु इत्थ सर्वे प्रथित अल स्वायु इह मांसमीमासया नयन्ति, '—देह, स्त्री, पुत्र, मित्र, सेवक, अश्व व वृषभ हे सर्वहि मला सतोष देणारे आहेत, असे समजून हे सर्व लोक आपले प्रसिद्ध असे सपूर्ण आयुष्य ह्या व्यवहारामध्ये मासमीमासा करीत घालवितात.—' ( कितु ) एते येन जीवन्ति '—परतु हे सर्व ( स्त्री-पुत्रादिक ) ज्याच्या योगाने जिवंत राहतात,—' ( तथा ) येन व्यवहृतिपटवः ( भवन्ति तथा येन ) सौभाग्यभाज ( भवन्ति ) ' ज्याच्यामुळे व्यवहारदक्ष होतात आणि ज्याच्यामुळे सौदर्यादिगुणसपन्न होतात,—' त अमु प्राणाधीश अतर्गतं अमृत नैव मीमासयन्ति '—त्या ह्या सर्वांतर्गत व मरणधर्मरहित अशा प्राणेश्वराची कधीच मीमासा करीत नाहीत. [ श्रीमत् आचार्य लोकांच्या अयोग्य वर्तनाकडे पाहून पुन: आश्चर्याने म्हणतात—हे अखिल लोक, देहादिक सर्वहि मला आनद देणारे आहेत, अशा अभिमानाने आणि त्याचप्रमाणे देहादि पुष्ट किंवा कृश झाले असता मीच पुष्ट किंवा कृश झालो आहे असे खोटेच मानून आपले कुल, शील, विद्या यानी प्रसिद्ध असलेले सर्व आयुष्य ह्या मांसाचा विचार करण्यांत व्यर्थ घालवितात. म्हणजे ते स्वसबद्ध अशा दुसऱ्या सर्व वस्तु व प्राणी माझे आहेत, यांच्या स्वास्थ्याने मला सुख होणार, मला एकट्याला सुख होण्याकरिता जगांतील अनंत प्राण्यांना अनत क्लेश झाले तरी कांही हरकत नाहीं, अशा विवचनेत आपले अमूल्य आयुष्य घालवितात; परतु हे सर्व देह-स्त्री-पुत्रादिक ज्याच्यामुळे जिवत राहतात, ज्याच्या योगाने मोठे व्यवहारकुशल होतात आणि ज्याच्या योगाने सौदर्यवान्, पराक्रमी, शूर, वीर इत्यादि विशेषणांना पात्र होतात, त्या सर्वांच्याहि अंतर्यामी असणाऱ्या व देहादिक नष्ट झाले तरी नष्ट न होणाऱ्या ह्या

स्वानुभवसिद्ध मुख्य आत्म्याचा कधीच विचार करीत नाहींत; हे केवढे आश्चर्य आहे !! बुद्धीला मोह पडला असता तिच्यामध्ये सदसद्विवेकशक्ति रहात नाही आणि त्यामुळेच खऱ्याला खोटे व खोट्याला खरे, असे ती मानिते. सर्व प्राकृत पुरुषाना मोह पडल्यामुळे त्यांना सद्रूप आत्म्याचा विसर पडतो व ते असत्य अनात्म्याच्या ठिकाणीच अभिमान ठेवितात. ह्यात आश्चर्य एवढेच की, ह्या आत्म्याचा सर्वदा अनुभव येत असूनहि त्याच्याविषयी थोडा तरी विचार करावा, असे त्याना कधी चुकूनहि वाटत नाही. ५

**कश्चित्कीटः कथंचित्पटुमतिरभितः कण्टकानां कुटीरम्**
**कुर्वंस्तेनैव साकं व्यवहृतिविधये चेष्टते यावदायुः ।**
**तद्वज्जीवोऽपि नानाचरितसमुदितैः कर्मभिः स्थूलदेहम्**
**निर्मायात्रैव तिष्ठन्ननुदिनममुना साकमभ्येति भूमौ ६**

**अन्वयार्थ**—' कश्चित् पटुमति कीटः कथंचित् अभितः कण्टकाना कुटीरं कुर्वन् तेनैव साकं व्यवहृतिविधये यावदायुः चेष्टते '—कोणी एक बुद्धिमान् कीटक मोठ्या प्रयत्नाने आपल्या सभोवती काट्यांचे घर करून त्यासहवर्तमानच व्यवहार होण्याकरिता सर्व आयुष्यभर क्रिया करीत असतो. —' तद्वत् जीवोपि नानाचरितसमुदितै कर्मभि' स्थूलदेह निर्माय अत्रैव तिष्ठन् अमुना साकं अनुदिन भूमौ अभ्येति '—त्याचप्रमाणे हा प्राणीसुद्धा नानाप्रकारच्या आचरणानी उत्पन्न झालेल्या कर्मानी स्थूलदेह निर्माण करून, त्यामध्येच राहून, त्यासहवर्तमान प्रतिदिवशी पृथ्वीवर संचार करितो. [ आतां देह आणि आत्मा यांचे साहचर्य दृष्टान्ताने दृढ करितात—ज्याप्रमाणे एखादा बुद्धिमान् किडा आपल्या कफापासून उत्पन्न केलेल्या धाग्यांनी आपल्याभोवती मोठ्या प्रयत्नाने कांट्यांचे घर करून खान-पानादिक व्यवहार करण्याकरितां सर्व जन्मभर त्या घरट्यासहवर्तमानच इकडे तिकडे फिरत असतो; त्याचप्रमाणे प्राणी अनेक जन्मांमध्ये अनेक आचरणे केल्याने त्यांपासून होणाऱ्या प्रारब्ध कर्माने स्थूल देह तयार करून व त्या देहामध्येच राहून त्याच्याच सहवर्तमान प्रतिदिनी पृथ्वीवर पर्यटन करीत असतो. म्हणजे जन्मभर त्या स्थूल देहाला न सोडितां सर्व स्थूल व्यवहार करितो. तात्पर्य असे कीं, त्या कांट्यांच्या घराप्रमाणेच असणारा हा अचेतन देह स्वतः कोणतीहि चेष्टा करीत नाहीं. कारण आत्म्याचा वियोग झाला असतां काष्ठासारखे मरून पडणारें शरीर ज्या

अर्थी कोणतीच चेष्टा करीत नाहीं, हे प्रत्यक्ष सिद्ध आहे, त्याअर्थी ह्या जड देहाकडून अनेक क्रिया करविणारा कोणी तरी चालक हा असलाच पाहिजे व तो चालक जीवच होय. जसे–रथ जड असल्यामुळे स्वतः त्याला चलनादिक कोणतीच क्रिया करितां येत नाही. पण अश्व जोडला की तोच वेगाने चालू लागतो. बरे, रथ नसून केवळ अश्वच असला तरीहि रथक्रिया होत नाही. त्याच न्यायाने कोणी चालक नसेल तर देहाची चेष्टाहि होणार नाही. तात्पर्य ह्या दोघांचे नित्य साहचर्य आहे ] ६.

**स्वीकुर्वन् व्याघ्रवेषं स्वजठरभृतये भीषयन्यश्च मुग्धान्**
**मत्वा व्याघ्रोऽहमित्थं सनरपशुमुखान् बाधते किं नु सत्त्वान्।**
**मत्वा स्त्रीवेषधारी स्त्र्यहमिति कुरुते किं नटो भर्तुरिच्छां**
**तद्वच्छारीर आत्मा पृथगनुभवतो देहतो यः स साक्षी ७**

**अन्वयार्थ**—' यः ( कश्चित् पुरुष ) स्वजठरभृतये व्याघ्रवेष स्वीकुर्वन् मुग्धान् भीषयन् ( आरते स. ) अह व्याघ्र इत्थ मत्वा सनरपशुमुखान् सत्त्वान् बाधते किनु ? '–जो ( कोणी एखादा पुरुष ) आपलें उदर भरण्याकरिता वाघाचा वेष घेऊन अज्ञ बालकाना भिववीत असतो, तो ' मी व्याघ्र आहे ' असे मानून मनुष्य, पशु इत्यादिकांसहवर्तमान इतर प्राण्याना पीडा करितो काय?–' तथा स्त्रीवेषधारी नटः अह स्त्री इति मत्वा भर्तुरिच्छां कुरुते किं ? '–किवा स्त्रीवेष घेतलेला नट ' मी स्त्री आहे ' असे मानून पतीची इच्छा करितो काय ?–' तद्वत् शारीर आत्मा देहत' यः अनुभवतः पृथक् अस्ति सः साक्षी '–त्याप्रमाणेच शरीराभिमानी आत्मा, जो अनुभवाने देहाहून निराळाच आहे, तो साक्षी आहे अर्थात् दहाचा व त्याचा काही मबंध नाहीं. [ याप्रमाणें जीवाला देह जरी प्राप्त झाला असला तरी तो पारमार्थिक–सत्य नव्हे, तर अविद्येने कल्पित असल्यामुळे कृत्रिम आहे. म्हणून आचार्य देहाला अनुसरून आत्म्याचे वागणे कधीहि योग्य होणार नाहीं; असे येथे दृष्टांताने निश्चित करतात—एखादा पुरुष भिक्षा मागून पोट भरण्याकरितां वाघाचा वेष घेतो आणि त्या वेषाने अज्ञ बालकादिकांना भिववीत रस्त्यांतून फिरत असतो. पण तो, माझ्या वेषानुरूप ' मी खरोखरच व्याघ्र आहे ' असे समजून प्राणिमात्रांची खऱ्या वाघाप्रमाणे हिंसा करितो काय ? छेः कधींच नाहीं. तर तो माझा हा व्याघ्रवेष माझ्या खऱ्या स्वरूपाहून निराळा आहे, असें जाणून

आपल्या वेषाला शोभेल असें ( वाघासारख्या उड्या मारणें, ओरडणें, हातवारे करणे इत्यादि ) कर्म करीत असतो. आचार्य हीच गोष्ट आणखी एका दृष्टान्तानें स्पष्ट करितात—स्त्रीचा वेष घेणारा नट विषयेच्छा परिपूर्ण करून घेण्याकरितां भर्त्याची इच्छा कधीं तरी करितो का ? कधीच नाहीं. तर तो आपल्या स्त्रीवेषाला अनुरूप असे नेत्रविलास, हस्तपादादिकांचे विन्यास इत्यादि हावभाव करून अन्य पुरुषांना मात्र लोभ उत्पन्न करितो. परंतु स्वतः ' मी स्त्री आहे ' असे समजून पुरुषसंभोगेच्छा कधीच करीत नाही. त्याचप्रमाणे शरीराने युक्त असणारा आत्मा देहाहून पृथक् आहे, असा ज्याअर्थी अनुभव येतो त्याअर्थी तो देहादिकाच्या क्रियांचा साक्षी आहे. ज्याप्रमाणे व्याघ्रवेषधारी किंवा स्त्रीवेषधारी पुरुष आपण व्याघ्र किंवा स्त्री नसून केवळ त्यांचे वेष घेणारे आहो, असे पक्के समजून स्ववेषानुरूप चेष्टा करीत असतात, त्याचप्रमाणे शरीरोपाधिक आत्मा, अनुभवाने ' मी शरीराहून पृथक् आहे ' असे समजल्यानंतर देहवेषानुरूप चेष्टा करीत असूनहि स्वतःच्या साक्षिरूपाला विसरत नाही. तात्पर्य देह पारमार्थिक नाही, म्हणून प्राकृत पुरुषाप्रमाणे तदनुरूप चेष्टा न करितां स्वस्वरूपाचे नेहमीं भान ठेवून व्यवहार करीत असावे. ] ७

**स्वं बालं रोदमानं चिरतरसमयं शान्तिमानेतुमग्रे**
**द्राक्षं खार्जूरमाम्रं सुकदलमथवा योजयत्यम्बिकास्य ।**
**तद्वच्चेतोऽतिमूढं बहुजननभवान्मौढ्यसंस्कारयोगा-**
**द्बोधोपायैरनेकैरवशमुपनिषद्बोधयामास सम्यक् ८**

**अन्वयार्थ**—'चिरतरसमय रोदमान स्वं बाल शांति आनेतुं अस्य अग्रे अम्बिका द्राक्ष खार्जूर आम्र अथवा सुकदल योजयति '–ज्याप्रमाणे पुष्कळ वेळपर्यंत रडत असलेले बालक उगी रहावे, म्हणून त्याची आई त्याच्यापुढे द्राक्ष, खजूर, आंबा किंवा उत्तम केळें ठेविते,–' तद्वत् उपनिषद् बहुजननभवात् मौढ्यसंस्कारयोगात् अवश सत् अतिमूढ चेतः अनेकैः बोधोपायैः सम्यक् बोधयामास'–त्याचप्रमाणे उपनिषदांनी, अनेक जन्म घेतल्यामुळें व त्यांतील अनेक मूढ संस्कारांमुळें चंचल व मूढ झालेल्या मनाला, अनेक बोधोपायांनीं उत्तम उपदेश केला आहे. [ ह्या श्लोकांत आत्मज्ञान होण्याकरितां अनेक उपाय योजणाऱ्या श्रुतिमातेचें कौशल्य दाखविलें आहे. एखादि माता, पुष्कळ वेळप-

र्यंत कशाकरिता तरी हट्ट घेऊन रडणाऱ्या आपल्या बालकाचे समाधान करण्याकरितां त्याच्या पुढे द्राक्ष-खर्जूरादिक गोड पदार्थांपैकी कांही पदार्थ टाकिते आणि त्यांपैकी एखाद्या तरी आवडीच्या पदार्थाने त्याचे समाधान व्हावे, अशी तिची इच्छा असते. त्याचप्रमाणे अनादिकालापासून अनेक जन्म घेतल्यामुळे व प्रत्येक जन्मात अनेक मूढ संस्कार झाल्यामुळे अत्यन्त चंचल झालेल्या ह्या अज्ञानमय अंतःकरणाला श्रुतिमातेनं ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणे अनेक ज्ञानोपायांनी बोध केला आहे. आत्मज्ञानाचे अनेक उपाय सांगण्यामध्ये त्या अत्यंत कारुणिक माउलीचा हाच हेतु की, यापैकी एखाद्याचा तरी स्वीकार करून प्राण्याने कृतार्थ व्हावे! लौकिक माता आपल्या मुलाचा संताप दूर होऊन त्याला शांति मिळावी, म्हणून जसे अनेक मिष्ट पदार्थांचे आमिष दाखविते, त्याचप्रमाणे श्रुतिमाउलीनेहि त्रिविध तापानी संतप्त झालेल्या मानवाला निरतिशय शांति प्राप्त व्हावी, म्हणून भजन, पूजन, यम, नियम, ध्यान, धारणा, श्रवण, मनन, इत्यादि, साधकाच्या इच्छेप्रमाणे व अधिकाराप्रमाणे अनेक उपाय योजिले आहेत. ] ८

**यत्प्रीत्या प्रीतिपात्रं तनुयुवतितनूजार्थमुख्यं स तस्मात्**
**प्रेयानात्माथ शोकास्पदमितरदतः प्रेय एतत्कथं स्यात् ।**
**भार्याद्यं जीवितार्थी वितरति च वपुः स्वात्मनः श्रेय इच्छं-**
**स्तस्मादात्मानमेव प्रियमधिकमुपासीत विद्वान्न चान्यत् ९**

**अन्वयार्थ**—' यत्प्रीत्या तनुयुवतितनूजार्थमुख्य प्रीतिपात्र ( भवति ) सः आत्मा तस्मात् प्रेयान् '—ज्याच्या प्रीतीने शरीर स्त्री, अपत्य व सर्वहि विषयजात ही प्रीतिपात्र होतात, तो आत्मा त्या सर्वांहून अधिक प्रेमास्पद ' अथ इतरत् शोकास्पद '—आणि त्याहून अन्य सर्वहि शोकास्पद आहे.—' अतः एतत् प्रेयः कथ स्यात् '—तेव्हा ते प्रीतिपात्र कसे होणार ? जीवितार्थी भार्याद्य वितरति '—स्वतःचे जीवित रहावे, अशी इच्छा करणारा भार्या-पुत्र मित्रादिकांना सोडतो.—' स्वात्मन. श्रेय. इच्छन् वपु ( वितरति ) '—आपल्या कल्याणाची इच्छा करून शरीराचाहि त्याग करितो.—' तस्मात् विद्वान् अधिकं प्रियं आत्मानमेव उपासीत '—तस्मात् विद्वान् पुरुषाने सर्वापेक्षां अधिक प्रिय असलेल्या आत्म्याचीच उपासना करावी.—' न चान्यत् '—अनात्म्याची करू नये. [ आचार्यांनीं आत्मा सर्वापेक्षां अधिक प्रिय आहे, हें ह्या नवव्या श्लोकांत

दाखविले आहे. ज्या आत्म्याच्या प्रीतीमुळे शरीरादि सर्वहि विषयजात प्रीतिपात्र होते, तो आत्माच खरे प्रेमाचे स्थान होय. सुख किंवा दुःख यांपैकीं कशाचा तरी अनुभव घेणे, याला भोग असे म्हणतात. तो भोग आत्म्यालाच होणे युक्त आहे. म्हणून विषयभोग घेण्याकरितां प्रवृत्त झालेल्या पुरुषाला प्रथमतः आत्म्याचीच प्रतीति होते आणि त्या मूलभूत आत्मप्रतीतिद्वारा सर्व विषय प्रिय होतात. त्यातहि शरीर हे भोगसाधन असल्यामुळे त्याचे ठिकाणीं प्रथम प्रेम जडते, तदनंतर भोगातील उत्तम भोग जी स्त्री तिच्यावर प्रीति बसते. पुढे स्त्री-पुरुषांच्या प्रेमापासून उत्पन्न होणाऱ्या पुत्राविषयी प्रेम उत्पन्न होते. त्यानंतर या सर्वांचा निर्वाह व्हावा, म्हणून द्रव्यार्जनाविषयी लोभ उत्पन्न होतो आणि शेवटी द्रव्यापासून साध्य होणारे अन्न-पान वस्त्र-तांबूलादि पदार्थ आवडू लागतात. एकंदरीत आत्म्याची प्रीति मुख्य व त्याच्या अपेक्षेने अन्य सर्वांविषयींची प्रीति गौण आहे, हे प्रत्यक्षसिद्ध आहे. ज्याच्याविषयीं खरी व मुख्य प्रीति असते तो आत्माच सर्वांपेक्षा अधिक प्रिय होय. याप्रमाणे आत्मा सर्वांपेक्षा अधिक प्रिय जरी असला, तरी प्राण्याची विषयाविषयीची जी प्रीति आपल्या अनुभवाला येते ती खरी प्रीति नव्हे, तर तो प्रीतीचा आभास आहे. दुःख हेच विषयांचे खरे स्वरूप आहे, असे आचार्यांनी "इतरत्" इत्यादि पदाने सुचविले आहे. उत्पत्ति, स्थिति व लय या तीन अवस्थामध्ये जे दुःखद ते सर्वदा दुःखरूपच असते, असा न्याय आहे. शिवाय सर्व अनात्मजात दुःख देणारे आहे, ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. "अर्जने रक्षणे नाशे क्लेशदो विषयो भवेत् । सुखार्थं सज्जते तत्र मूढधीरिति विस्मयः"— विषय प्राप्त करून घेताना, प्राप्त झाल्यानंतर त्याचे रक्षण करिताना व तो नष्ट झाला असता क्लेश देतो. पण मूढबुद्धि पुरुष त्याचे ठिकाणी सुखाकरितां आसक्त होतो, हे मोठे आश्चर्य आहे, असे एकेठिकाणी म्हटलें आहे. ह्या वचनाप्रमाणे व अन्वय-व्यतिरेकन्यायाने सर्व विषयजात दुःखास्पद आहे, असे सिद्ध झाले असतां त्याच्याविषयी प्रेम कसे वाटणार ? आतां आत्मा सर्वांपेक्षां अधिक प्रिय कसा हे "**भार्याद्यं०**" इत्यादि चरणांत सांगितलें आहे. स्वतः जिवंत रहावे, अशी इच्छा करणारा पुरुष भार्या-पुत्र-मित्रादिकांचाहि त्याग करून स्वतःचे रक्षण करितो. शिवाय "आत्मानं सततं रक्षेद्दारैरपि धनैरपि" अशी लौकिक म्हणहि आहे. फार काय पण शरीरसुद्धां आत्मा नव्हे, असें '**वपुः०**' इत्यादि पदांनी आचार्य सांगतात. स्वतःचें अत्यंत कल्याण व्हावें, म्हणून लोक स्वशरीराचेहि गंगेमध्ये संतर्पण करून

किंवा क्षात्रधर्माप्रमाणे ते धारातीर्थी ठेवून ज्याअर्थी स्थूलदेहाचा नाश करून घेतात त्याअर्थी शरीरापेक्षां आत्मा अधिक प्रिय आहे व त्याच्याकरितांच शरीरादिक अन्य सर्व अनात्मजात प्रिय वाटत असते. तस्मात् विद्वान् पुरुषानें सर्वापेक्षां अत्यत प्रिय असणाऱ्या आत्म्याचीच उपासना करावी. परिणामीं निष्फळ होणारी देहादिक जडवर्गाची सेवा करू नये. ] ९.

**यस्माद्यावत्प्रियं स्यादिह हि विषयतस्तावदस्मिन्प्रियत्वं**
**यावद्दुःखं च यस्माद्भवति खलु ततस्तावदेवाप्रियत्वम् ।**
**नैकस्मिन्सर्वकालेऽस्त्युभयमपि कदाप्यप्रियोऽपि प्रियः स्यात्**
**प्रेयानप्यप्रियो वा सततमपि यतः प्रेय आत्माख्यवस्तु १०**

**अन्वयार्थ**—' इह हि यस्मात् विषयतः यावत् प्रिय ( भवति ) तावत् अस्मिन् प्रियत्व '–व्यवहारामध्ये ज्या विषयापासून जेवढे सुख होत असते, तेवढेच त्याच्या ठिकाणी प्रियत्व असते–' यावत् यस्माच्च दुःख भवति खलु ततः तावत् एव अप्रियत्वं '–आणि ज्याच्यापासून जेवढे दुःख होते तेवढेंच त्याच्या ठिकाणी अप्रियत्व असते–' सर्वकाले एकस्मिन् उभयमपि न अस्ति ' –सर्व काली एकाच वस्तूच्या ठिकाणीं प्रीति आणि अप्रीति हीं दोन्हीं कधींहि रहात नाहींत.– ' कदापि अप्रियोऽपि प्रियः प्रेयान् अपि अप्रियो वा स्यात् यतः ( ततः ) सततमपि आत्माख्यवस्तु प्रेय '–कारण प्रसंगविशेषीं ज्याअर्थी अप्रिय वस्तुहि प्रिय होते व प्रिय पदार्थहि अप्रिय होतो, असे आहे, त्याअर्थी सतत प्रिय अशी आत्मा हीच एक वस्तु आहे. [ शरीरादिक अनात्म वस्तूच्या ठिकाणचे प्रेम, आत्म्याच्या प्रेमामुळेच कसें आहे, हे येथे स्पष्ट करून सांगतात—विषयांचा उपभोग घेत असतां ज्या भार्यादि विषयांपासून पुरुषाला जोपर्यंत सुख होत असते, तोपर्यंतच त्याचें त्या विषयांच्या ठिकाणी प्रेम असते. तसेच, त्याच भार्यादि विषयांपासून जसें जसे दुःख होऊं लागते तसे तसे ते अप्रिय होऊं लागतात. सारांश प्रियत्व व अप्रियत्व हीं विषयाच्या ठिकाणीं नियत कधींच नसतात. केव्हां केव्हां अप्रिय वस्तुहि कांहीं कारणाने प्रिय होते आणि तसेच एखादे वेळीं अत्यंत प्रिय असलेले भार्यादि विषयहि अप्रियाचरणादि आणि शरीरव्यथा इत्यादि निमित्तांनीं कालपरत्वें अप्रिय होतात. पण आत्म्याची गोष्ट तशी नाहीं. याअर्थी सर्वदा तीच एक वस्तु खरी प्रिय होय. ह्या श्लोकांतील प्रतिपादनाला

आधारभूत अशी बृहदारण्यकामध्ये 'न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रियाः०' इत्यादि श्रुति आहे. ( बृह. भाष्यार्थ अ. २ पृ. १७९ पहा. ) त्या श्रुतीवरील आचार्यकृत भाष्याचे तात्पर्य येथे दिले असतां श्लोकार्थ स्पष्ट होईल म्हणून तें येथे देतो—याज्ञवल्क्य मैत्रेयीला म्हणतात की, हे मैत्रेयि, पुत्रांची इच्छा पूर्ण होण्याकरितां पुरुषाला पुत्र प्रिय होत नसतात, तर आत्म्या-( स्वतः )-ची इच्छा पूर्ण होण्याकरितां ते प्रिय होतात. प्रथम स्वतःचा आत्मा प्रिय असतो म्हणून मग त्याच्याकरितां पुत्र हवेसे वाटतात. आपल्या पुत्राकरिता एक केळे घ्यावें, असे बाजारांत गेलेल्या पुरुषाला वाटते. ह्याठिकाणीं पुत्राची प्रीति मुख्य आणि पुत्राकरितां फलादिकांच्या ठिकाणची प्रीति गौण असते. तसेच आत्म्याविषयींची प्रीति मुख्य आणि त्याच्याकरितां पुत्रादिकांची प्रीति गौण होय. सारांश आत्मप्रीतीच्या अगत्वाने बाकी सर्वांचे ठिकाणी प्रीति असते. त्या त्या पुत्र-वित्तादिकांविषयींच्या एषणा ( इच्छा ) सोडणे अति कठिण आहे. ही आत्माख्य वस्तु खरोखरच पुत्राहून अति प्रिय आहे. कारण स्वभावतः जरी पुत्र प्रिय वाटत असला तरी आत्म्याशी त्याची तुलना करून पाहिले असतां आत्माच अधिक प्रिय वाटतो. तसेच, वित्तादि सर्व विषयांहूनाहि आत्मा अधिक प्रिय आहे, ही गोष्ट केवळ शब्दसिद्ध आहे असे नव्हे, तर युक्तितःहि ती सिद्ध होते. हा आत्मा सर्वांच्याहि 'अंतर्' आहे व पुत्र-मित्रादि सर्व विषय 'बहिर्' आहेत. ही एक युक्ति व दुसरी युक्ति अशी की, आत्म्यापेक्षां पुत्रवित्तादि अधिक प्रिय आहेत, असे म्हणणाऱ्या पुरुषाला असे विचारावे कीं, तुला अभिमत असलेले हे पुत्रवित्तादिक विषय जर अधिक प्रिय, तर त्याच्या उत्पत्ति, स्थिति व नाश या तीनहि कालांमध्ये त्यांच्यापासून तुला शोक कां होतो ? ज्यांच्यापासून दुःख होते ते प्रिय, असे म्हणणे कधी तरी शहाणपणाचे होईल का ? भगवतांनी गीतेमध्ये सांगितले आहे की, " ये हि संस्पर्शजा०....रमते बुधः " ( गी. भा. पृ. ९२१. ) अर्जुना, जे इंद्रिये व विषय यांच्या संसर्गाने होणारे भोग ते सर्वहि दुःखमूलकच आहेत. तसेच ते उत्पत्तिविनाशशील आहेत आणि म्हणून त्यांच्या ठिकाणी सुज्ञ पुरुष कधींहि रममाण होत नाहीं. सारांश सर्वहि विषय दुःखाला कारण होणारे आहेत; म्हणून सर्वदा सर्वांत अधिक प्रिय असणाऱ्या आत्म्याविषयीं आदरबुद्धि ठेवून पुत्रादि अनात्म्यांचा अनादर करावा. याप्रमाणे जो आत्म्याचीच उपासना करितो, त्याला विषय प्रिय वाटत नाहींत. ज्याप्रमाणें पुरुष घृताची रुचि समजेपर्यंत तैल भक्षण करीत असतो, त्याप्रमाणेंच

आत्मानुभव येईपर्यंत हे पुत्रादि प्रिय वाटतात. भगवंतांनींहि " यं लब्ध्वा चापरं लाभ मन्यते नाधिकं ततः "–ज्याची प्राप्ति झाली असतां अन्य कोणताहि लाभ त्याहून अधिक प्रिय वाटत नाही, असे म्हटले आहे. गी. भा. पृ. ५८० ] १०

**श्रेयः प्रेयश्च लोके द्विविधमभिहितं काम्यमात्यन्तिकं च**
**काम्यं दुःखैकबीजं क्षणलवविरसं तच्चिकीर्षन्ति मन्दाः ।**
**ब्रह्मैवात्यान्तिकं यन्निरतिशयसुखस्यास्पदं संश्रयन्ते**
**तत्त्वज्ञास्तच्च काठोपनिषदभिहितं षड्विधायां च वल्ल्याम् ११**

**अन्वयार्थ**—' लोके काम्य आत्यन्तिक च ( इति ) श्रेयः प्रेयश्च द्विविधं अभिहित '– या जगामध्ये काम्य आणि आत्यंतिक असे श्रेय व प्रेय दोन प्रकारचे सांगितले आहे.–' यत् दुःखैकबीज क्षणलवविरस काम्य तत् मन्दाः चिकीर्षन्ति '–त्यांतील काम्य हे केवळ दुःखालाच कारण होणारे असून त्याचे रमणीयत्व क्षणिक असते. पण मूढ पुरुष तेच संपादन करण्याची इच्छा करितात. ' ब्रह्मैव आत्यंतिक–' ब्रह्म हेच आत्यंतिक होय.–' यत् निरतिशयसुखस्यास्पद ( यच्च ) तत्त्वज्ञाः संश्रयन्ते'–जे निरतिशय सुखाचे स्थान असून तत्त्वज्ञ पुरुष ज्याचा आश्रय करितात–' तच्च काठोपनिषदभिहित ( कुत्र इति चेत् ) षड्विधायां च वल्ल्याम् '–ते ब्रह्म कठोपनिषदामध्ये सांगितले आहे. ( कोठे म्हणाल तर ) षड्विधवल्लीमध्ये सांगितले आहे. [ आत्मा सर्वांत अधिक प्रिय आहे, ह्याविषयीं काठोपनिषदाचेंहि प्रमाण देतात. लोकांमध्ये प्रसिद्ध असलेले जें श्रेय म्हणजे पुण्यसाधन व प्रेय म्हणजे प्रीतिपात्र, ते काम्य आणि आत्यंतिक, असे दोन प्रकारचे आहे. फलाच्या उद्देशाने जे कर्म करितात ते काम्य श्रेय होय आणि जे मोक्षसाधन ते आत्यंतिक श्रेय होय. त्याचप्रमाणे जायापुत्रादिक हें काम्य प्रेय व आत्मा ( म्ह० हा शरीरेंद्रियसमूह साक्षी ) आत्यंतिक प्रेय होय. यांपैकीं काम्य श्रेय किंवा प्रेय केवळ दुःखालाच कारण होत असतें. असे जर आहे तर लोकांची त्यांत प्रवृत्ति कशी होते ? अशी शंका कोणी घेतील म्हणून सांगतात—ते काम्य भ्रमाने शुक्तिकेच्या ठिकाणीं भासणाऱ्या रजताप्रमाणें अगदीं थोडा वेळपर्यंतच मोठें रमणीय दिसत असते आणि म्हणून परिणामाकडे लक्ष्य न देणारे मंद पुरुष त्याचा स्वीकार करितात. त्याचप्रमाणें आत्यं-

तिक श्रेय किंवा प्रेय जें ब्रह्म ते निरतिशय सुखाचे स्थान आहे आणि तत्त्वज्ञ पुरुष त्याचाच अंगीकार करितात. हाच सिद्धान्त कठोपनिषदामध्येहि सांगितला आहे. कठशाखा मोठी असल्यामुळे सहा वल्लींनी युक्त असलेल्या कठोपनिषदांत हे सागितले आहे, (काठकोपनिषद्भाभाष्यार्थ पृ. ३९ पहा.) असे आचार्य सांगतात. ११.

**आत्माम्भोधेस्तरङ्गोऽस्म्यहमिति गमने भावयन्नासनस्थः**
**संवित्सूत्रानुविद्धो मणिरहमिति वा चेन्द्रियार्थप्रतीतौ ।**
**दृष्टोऽस्म्यात्मावलोकादिति शयनविधौ मग्न आनन्दसिन्धा-**
**वन्तर्निष्ठो मुमुक्षुः स खलु तनुभृतां यो नयत्येवमायुः १२**

**अन्वयार्थ**—'गमने अह आत्माम्भोधेः तरगः (इति भावयन्)'—गमनप्रसगी 'मी आत्मसमुद्राचा एक तरग आहे' अशी भावना करणारा,—'आसनस्थः सवित्सूत्रानुविद्धः मणिः अह अस्मि (इति भावयन्)'—आसनावर बसला असता 'ज्ञानरूप सूत्रामध्ये ओवलेला मी एक मणि आहे' अशी भावना करणारा —'इद्रियार्थप्रतीतौ आत्मावलोकात् हृष्टोस्मि (इति भावयन्)'—विषयानुभव घेत असतां आत्मदर्शन झाल्याने मी अत्यंत आनदित झालो आहे, अशी भावना करणारा व '—शयनविधौ आनन्दसिन्धौ मग्न. च (इति भावयन्)'—निद्रावस्थेमध्ये मी आनदसमुद्रामध्ये निमग्न झालों आहे, अशी भावना करणारा 'यः मुमुक्षुः एव आयु. नयति स खलु तनुभृता अन्तर्निष्ठः'—जो मुमुक्षु याप्रमाणे आपले आयुष्य घालवितो, तो खरोखर प्राण्यामध्ये अतर्निष्ठ होय. [हे सर्वहि ब्रह्म आहे, अशा भावनेने सिद्ध झालेल्या अतर्निष्ठ पुरुषाचे स्वरूप बारा आणि तेरा अशा दोन श्लोकांमध्ये सांगितले आहे. प्रसंगविशेषीं इकडे तिकडे गमन करीत असतां ज्याप्रमाणे पाण्याची लाट बाह्याभ्यंतर जलमयच असून इकडे तिकडे फिरते, त्याप्रमाणे मी—जीवसुद्धां ह्या पारावारशून्य आत्मसमुद्रामध्ये बाह्याभ्यतर तन्मयच असल्यामुळे लाटेसारखा आहे, अशी भावना करीत गमन करितो. "क्रीडन्नूर्मिरपामिव"—उदकाच्या लाटेप्रमाणें क्रीडा करणारा अशी श्रुतिहि आहे. त्याचप्रमाणें आसनावर स्वस्थ बसला असतां तो 'आत्मस्वरूपभूत—ज्ञानरूप सूत्रामध्ये ओंवलेला मी जीवरूपी (माळेंतील मण्याप्रमाणें) एक माणि आहें, अशी भावना करीत असतो. "मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव"—सूत्रामध्ये जसे माळेचे माणि ओंवलेले असतात,

त्याप्रमाणे माझे ठिकाणीं हे सर्व दृश्यजात ओवलेलें आहे, असें भगवंतांचेंहि म्हणणे आहे. (सु. गी. पृ. १३९) ह्याप्रमाणें देह व्यापार करीत असतांहि मुमुक्षु अंतर्निष्ठ कसा असतो हे दाखवून आतां त्याचा इंद्रियव्यापार चालला असतांहि तो अंतर्निष्ठच असतो हें दाखवितात. ज्याअर्थी कोणताहि अनुभव आत्म्याच्या ज्ञानकलेवांचून येणे शक्यच नाहीं त्याअर्थी तो त्या त्या इंद्रियाच्या विषयाचा अनुभव घेत असतां ' मला ह्यावेळीं आत्म्याचेच दर्शन झाल्यामुळे मी अत्यंत सतुष्ट झालो आहे ' अशी भावना करितो व निद्रावस्था संपल्यानंतर मी आनंदसमुद्रामध्यें एवढा वेळपर्यंत निमग्न होतो, अशी भावना करितो. सारांश ह्याप्रमाणें जो मुमुक्षु आपले आयुष्य घालवितो त्यालाच अंतर्निष्ठ असे म्हणतात. ह्या श्लोकांत स्थूल देहाच्या व्यवहाराने जाग्रदवस्था; विषयानुभवाने स्वप्न किंवा सूक्ष्मावस्था आणि निद्रावस्थेने कारणावस्था दाखवून ह्या तिन्ही अवस्थांमध्यें अतर्निष्ठ पुरुष आत्मानुसंधान कसे ठेवितो, हे सुचविले आहे. ] १२.

**वैराजव्यष्टिरूपं जगदखिलमिदं नामरूपात्मकं स्याद्**
**अन्तःस्थप्राणमुख्यात्प्रचलति च पुनर्वेत्ति सर्वान्पदार्थान् ।**
**नायं कर्ता न भोक्ता सवितृवदिति यो ज्ञानविज्ञानपूर्णः**
**साक्षादित्थं विजानन् व्यवहरति परात्मानुसंधानपूर्वम् १३**

**अन्वयार्थ**—' इदं अखिलं नामरूपात्मक जगत् वैराजव्यष्टिरूपं स्यात् '— हें सर्वहि नामरूपात्मक जगत् विराट्स्वरूप परमात्म्याच्या व्यष्टिरूप आहे; —' पुनश्च अन्तःस्थप्राणमुख्यात् प्रचलति '—आणि सर्व जगद्व्यवहार त्यांतील चैतन्यामुळे होतो,—' (तथा तस्मादेव) सर्वान् पदार्थान् वेत्ति,—' त्या चैतन्यामुळेंच त्याला सर्व पदार्थांचे ज्ञान होते.—' सवितृवत् न अयं कर्ता न भोक्ता इति ज्ञानविज्ञानपूर्णः यः [ भवति ] '—तसेच सूर्याप्रमाणे हा कर्ता किंवा भोक्ता नव्हे, अशा परोक्ष व अपरोक्ष ज्ञानाने जो पूर्ण असतो—' स साक्षात् इत्थं विजानन् आत्मानुसंधानपूर्वं व्यवहरति, '—तो साक्षात् असे जाणून आत्मानुसंधानपूर्वक सर्व व्यवहार करितो. [ज्याची अंतःकरणवृत्ति आत्मरूप झालेली आहे तो पुरुष ज्यावेळीं बाह्यदृष्टि होतो, म्हणजे प्रारब्धकर्मानुरूप व्यवहार करूं लागतो, त्यावेळीं हें सर्वहि नाम-रूपात्मक विचित्र जगत् स्थूल समष्टिरूप जो विराट् त्या परमात्म्याच्या व्यष्टिरूप आहे म्हणजे त्याची ही

एक आकृति आहे, अशी भावना करून जगांतील कोणत्याहि प्राण्यांची किंवा पदार्थांची निंदा अथवा मत्सर न करितां व्यवहार करितो; त्याचप्रमाणें विराडात्म्याच्या व्यष्टिरूप असलेलें हें सर्वहि जगत् अंतःस्थ चिद्रूप मुख्य प्राणाच्या योगानें व्यापार करितें, तसेंच त्या चैतन्यामुळेंच सर्व पदार्थांना जाणतें, असे जाणून त्या परमात्म्याचे ठिकाणीं अनुसंधान ठेवून तो व्यवहार करितो. तसेंच, हा आत्मा सूर्याप्रमाणें सर्वांना चेतना देणारा असला तरी कर्तृत्वाभिमानशून्य असल्यामुळे कर्ता नव्हे व सर्व पदार्थांचा अनुभव घेत असूनहि भोक्तृत्वाभिमानशून्य असल्यामुळे तो भोक्ताहि नव्हे, इत्यादि शास्त्रोत्पन्न ज्ञानानें व साक्षात् अनुभवानें जो पुरुष पूर्ण झालेला असतो, तो हें असेंच आहे, असें निश्चयानें जाणून, सर्वदा आत्म्याकडेच अनुसंधान ठेवून व्यवहार करितो. ] १३.

**नैर्वेद्यं ज्ञानगर्भं द्विविधमभिहितं तत्र वैराग्यमाद्यं**
**प्रायो दुःखावलोकाद्भवति गृहसुहृत्पुत्रवित्तैषणादेः ।**
**अन्यज्ज्ञानोपदेशाद्यदुदितविषये वान्तवद्धेयता स्यात्**
**प्रव्रज्याऽपि द्विधा स्यान्नियमितमनसां देहतो गेहतश्च ॥ १४**

**अन्वयार्थ**—' ( वैराग्य ) नैर्वेद्य ज्ञानगर्भं ( च इति ) द्विविध अभिहितं '— वैराग्य नैर्वेद्य आणि ज्ञानगर्भ, असे दोन प्रकारचे सांगितलें आहे.—' तत्र आद्यं वैराग्यं प्रायः गृहसुहृत्पुत्रवित्तैषणादेः दुःखावलोकात् भवति '—त्यापैकी पहिलें जे नैर्वेद्यनांवाचे वैराग्य ते बहुतकरून गृह, सुहृत्, पुत्र, वित्त इत्यादिकांच्या इच्छेमुळे प्राप्त होणाऱ्या दुःखाचा अनुभव आला असतां होते.—' अन्यत् ज्ञानोपदेशात् [ भवति ] '—दुसरें जें ज्ञानगर्भनांवाचे वैराग्य ते ज्ञानोपदेशामुळें प्राप्त होते.—' यत् उदितविषये वान्तवत् हेयता स्यात् '—ज्यामुळे पुत्रादिक विषय प्राप्त झाले असतां ते वान्तीप्रमाणे त्याज्य होतात.—' [तथा] नियमितमनसां प्रव्रज्या अपि देहतः गेहतः च इति द्विधा स्यात् '—तसेंच, आत्मसंयमी लोकांचा देहापासून व गेहापासून असा संन्यास सुद्धा दोन प्रकारचा आहे. [ आचार्य या चवदाव्या श्लोकांत दोन प्रकारचे वैराग्य सांगतात— वैराग्य हा ज्ञानाचा उपाय आहे. तें वैराग्य दोन प्रकारचें सांगितलें आहे. त्यांतील एकाला नैर्वेद्य म्हणजे दुःखापासून उत्पन्न झालेले व दुसऱ्याला ज्ञानगर्भ म्हणजे ज्ञानमाहात्म्याने प्राप्त झालेले असे म्हणतात. पहिलें जें नैर्वेद्य, तें

बहुतकरून गृह, सुहृत् , पुत्रैषणा, वित्तैषणा इत्यादिकांपासून प्राप्त होणाऱ्या दुःखामुळें उत्पन्न होतें. दुःख होऊं नये म्हणून विंचू, साप इत्यादिकांना जसा कोणी स्पर्श करीत नाहींत, त्याचप्रमाणे परिणामीं ज्यांच्यापासून दुःख होतें, अशा पुत्रवित्तादिकांचे ठिकाणीं विचारवान् पुरुष आदर ठेवीत नाहींत आणि यदाकदाचित् त्यांचा त्यांविषयीं प्रथम आदर असला, तरी मग ते तो मोठ्या प्रयत्नानें सोडितात. दुसरें जें ज्ञानगर्भ वैराग्य, ते केवळ ज्ञानोपदेशानें उत्पन्न होतें. प्रथमतः गृह, पुत्र इत्यादिक दुःखमय आहेत, असा अनुभव आल्यानें वैराग्य होतें, असें सांगून, आतां आत्म्याहून भिन्न असलेले सर्व अनात्मजात दुःखरूप आहे, असा गुरूपदेश झाल्यानें पूर्वोक्त विषय वान्तीप्रमाणें त्याज्य होतात, असें सुचविलें आहे. ज्याप्रमाणें वान्ति झाली असतां पुनः तिचे भक्षण करावें, अशी इच्छा होत नाहीं, त्याप्रमाणेच विषय हे अत्यंत नीरस आहेत, असें ज्ञान झाले असतां विवेकी पुरुषाला पुनः ते ग्रहण करण्याची इच्छा होत नाहीं. योगवासिष्ठामध्ये " बुध्वाप्यत्यन्तवैरस्य यः पदार्थेषु दुर्मतिः । बध्नाति वासनां भूयो नरो नासौ स गर्दभः "—जो मूढ पुरुष हे सर्वहि सृष्ट पदार्थ अत्यंत नीरस आहेत, असें जाणूनहि पुनः त्याच्या ठिकाणीं दृढ वासना ठेवितो तो मनुष्य नव्हे तर गर्दभ होय, असें सांगितलें आहे. संन्यासहि दोन प्रकारचा आहे. एक स्त्री, पुत्र, वित्त इत्यादिकांचा त्याग करून शास्त्रोक्त रीतीनें गृहांतून निघून जाणे—संन्यास करणे व दुसरा देहविषयक अभिमानाचा संन्यास ( सर्वथा त्याग ) करणें. देहाभिमानशून्य होणें, हाच देहतः संन्यास होय. सारांश—शिखासूत्राचा त्याग करून, भगवीं वस्त्रें धारण करून, सर्व लौकिक स्वत्वाचा त्याग करून, यतिधर्मानें कोठे तरी रहाणें, या आश्रम संन्यासाला गृहतः संन्यास व गृहादिकांप्रमाणेच प्रत्यक्ष स्वशरीराच्या ठिकाणचाहि अभिमान सोडून विदेहावस्थेमध्यें रहाणें, याला देहतः संन्यास असें म्हणतात. ] १४.

**यः कश्चित्सौख्यहेतोस्त्रिजगति यतते नैव दुःखस्य हेतो-**
**र्देहेऽहंता तदुत्था स्वविषयममता चेति दुःखास्पदे द्वे ।**
**जानन्रोगाभिघाताद्यनुभवति यतोऽनित्यदेहात्मबुद्धि-**
**र्भार्यापुत्रार्थनाशे विपदमथ परामेति नारातिनाशे ॥ १५**

**अन्वयार्थ—' त्रिजगति यःकश्चित् सौख्यहेतोः यतते नैव दुःखस्य हेतोः '—**

या त्रैलोक्यामध्यें कोणीहि पुरुष सौख्याकरितां यत्न करीत असतो; दुःखाकरितां नव्हे. ‘ ( एवं सति ) देहे अहंता तदुत्था स्वविषयममता च इति द्वे दुःखास्पदे भवतः ’–तरी देहाचे ठिकाणीं असलेली अहंता व तिच्यामुळें देहाच्या हितासाठीं उत्पन्न होणारी विषयममता हीं दोन दुःखस्थानें आहेत. –‘ यतः अनित्यदेहात्मबुद्धिः ( ततः एव ) जानन् ( अपि ) रोगाभिघातादि अनुभवति ’– पण मनुष्य अनित्य देहाचे ठिकाणीं आत्मबुद्धि ठेवीत असल्यामुळें असें जाणत असूनहि सर्वदा रोगादिकांचे आघात–क्लेश अनुभवितो; – ‘ ( तथा ) भार्यापुत्रार्थनाशे अथ परां विपदं एति ’ –भार्यापुत्रादि विषय नष्ट झाले असतांहि तो मोठ्या विपत्तीमध्यें पडतो. ( परंतु )–‘ अरातिनाशे ( विपदं ) न ( एति ) ’ –पण शत्रूचा नाश झाला असतां त्याला दुःख होत नाहीं. [ ह्या पंधराव्या श्लोकामध्यें द्विविध वैराग्यापैकीं ज्ञानाला कारण होणाऱ्या वैराग्याचा उपदेशरूपाने निर्देश करितात—या त्रिभुवनांत कोणीहि जरी झाला तरी तो स्वतःला सुख व्हावे, या हेतूनेच यत्न करीत असतो; दुःख व्हावे म्हणून कधींहि कोणी प्रयत्न करीत नाहीं. पण ह्याप्रमाणें सुखाकरिताच प्रयत्न करीत असतांहि देहाच्या ठिकाणीं असलेली अहंता आणि त्या देहाचे हित व्हावें म्हणून उत्पन्न झालेली विषयममता हीं दोन दुःखोत्पत्तीचीं स्थाने आहेत आणि हें जाणत असूनहि अनित्य देह हाच मी असा निश्चय ठेवणाऱ्या प्राकृत पुरुषाला ज्वरादि रोगापासून असह्य पीडा सहन कराव्या लागतात. म्हणजे देहाचे ठिकाणीं अहंता ठेवल्यानेंच केवळ त्याला हें दुःख अनुभवावे लागतें. तसेच, भार्या-पुत्रादिविषयांच्या ठिकाणीं ममता ठेविल्यानें त्यांचा नाश झाला असतांहि या पुरुषाला अत्यन्त यातना सहन कराव्या लागतात. पण ज्याप्रमाणे शत्रूच्या ठिकाणीं ममता नसल्यामुळें त्याच्या नाशानें कोणीहि पुरुष दुःखी होत नाही, तसाच देह व तत्संबधीं विषय यांच्या ठिकाणीं ममता न ठेवणारा पुरुष दुःखी होणार नाहीं. सारांश—ज्या ठिकाणीं अहंता किंवा ममता त्याठिकाणीं दुःख, असे ह्यांचें साहचर्य धूर व अग्नि यांच्या साहचर्याप्रमाणे सिद्ध आहे. ] १५.

**तिष्ठन् गेहे गृहेशोऽप्यतिथिरिव निजं धाम गन्तुं चिकीर्षु-**
**र्गेहस्थं दुःखसौख्यं न भजति सहसा निर्ममत्वाभिमानः ।**
**आयत्रायास्यतीदं जलदपटलवद्यातृ यास्यत्यवश्यं**
**देहाद्यं सर्वमेव प्रविदितविषयो यश्च तिष्ठत्ययत्नः ॥१६**

अन्वयार्थ—' गृहेशः गेहे तिष्ठन् अपि निजं धाम गन्तुं चिकीर्षुः अतिथिः इव निर्ममत्वाभिमानः सन् गेहस्थं दुःखसौख्यं सहसा न भजति'– गृहस्थ गृहांत रहात असूनहि स्वग्रामाला जाण्याची इच्छा करणाऱ्या एखाद्या अतिथी-प्रमाणें अहंता व ममता यांनीं रहित असल्यामुळें गृहांतील सुखदुःखांनीं कधींहि सुखी किंवा दुःखी होत नाहीं.–' इह देहाद्य सर्वे एव जलदपटलवत् अवश्यं आयात् आयास्यति यच्च यात् ( तत् ) यास्यति ( इति ) प्रविदितविषयः अयत्नः सन् तिष्ठति '—तर मेघपटलाप्रमाणें हे सर्वहि देहादि विषयजात, जें अवश्य येणारें असेल तें येईल व जे जाणारे असेल तें जाईल; ह्याप्रमाणें यथार्थ-ज्ञानी होऊन कांहींहि प्रयत्न न करतां घरीं रहातो. [ आतां आचार्य संन्यास करून गृहत्याग करणे जरी अत्यंत अवश्य आहे तरी शरीरादिकांच्या पारतं-त्र्यामुळें संन्यास करावयास अशक्त असलेल्या विवेकी पुरुषाला गृहांत राहू-नहि मोक्षोपायाचें अनुष्ठान करितां येते, असें येथे सांगतात—ज्याप्र-माणें आपल्या स्वतःच्या गांवाला जाण्याची इच्छा करणारा अतिथि मार्गा-मध्यें कांहीं काल विश्रांति घेण्याकरितां एखाद्या गृहामध्ये उतरला असतां तेथील सुख-दुःखांनीं सुखी किंवा दुःखी न होतां मी या ठिकाणाहून आज किंवा उद्यां अवश्य जाणार आहें, असा निश्चय करून असतो; त्याप्रमाणें एखादा गृहस्थ घरांत राहून सुद्धां सर्व विषयांविषयी अहंता व ममता सोड-ल्याने संसारविषयक कोणत्याहि सुख-दुःखांनीं सुखी किंवा दुःखी होत नाहीं. तर मग विषयांची प्राप्ति झाली असतां किंवा त्यांचा नाश झाला असतां तो उदासीन कसा रहातो, हें पुढील श्लोकार्धांत सांगितले आहे. ज्याप्रमाणें मेघ-समूह यदृच्छेने उत्पन्न होतो व लय पावतो, त्याप्रमाणें देहादि सर्वहि विषय-जात जें अवश्य येणारें असेल तें येईल व जाणारे असेल तें जाईल, असें जा-णतो व अशा अन्वय-व्यतिरेकांनीं ज्याला सर्व विषयांचे ज्ञान झाले आहे तो विद्वान् पुरुष, सुखप्राप्तीकरिता किंवा दुःखपरिहाराकरितां कांहींच यत्न न करितां घरांत रहातो. सारांश—स्वतःच्या देहाविषयीं अभिमान व तत्प्रयुक्त ममता सोडून जरी एखादा विद्वान् पुरुष शरीरादिकांच्या अशक्ततेमुळें संन्यासाश्रमाचा आश्रय न करितां घरांत राहिला तरी तो मोक्षमार्गापासून च्युत होत नाहीं. ] १६.

**शक्त्या निर्मोकतः स्वाद्बहिरहिरिव यः प्रव्रजन् स्वीयगेहा-**
**च्छायां मार्गद्रुमोत्थां पथिक इव मनाक् संश्रयेद्देहसंस्थाम् ।**

क्षुत्पर्याप्तं तरुभ्यः पतितफलमयं प्रार्थयेद्भैक्ष्यमन्नं
स्वात्मारामं प्रवेष्टुं स खलु सुखमयं प्रव्रजेद्देहतोऽपि ॥१७

अन्वयार्थ—' अहिः स्वात् निर्मोकतः शक्त्या बहिः इव यः स्वीयगेहात् प्रव्रजन् मार्गद्रुमोत्थां छायां पथिकः इव मनाक् देहसंस्थां संश्रयेत् '—ज्याप्रमाणें सर्प मोठ्या शक्तीनें आपल्या काते-( जीर्णत्वचे-) पासून बाहेर निघतो, त्याप्रमाणें पुरुषानें स्वतःच्या घरांतून मोठ्या प्रयत्नानें बाहेर पडून, ज्याप्रमाणें मार्गस्थ मार्गातील वृक्षाच्या छायेचा थोडा वेळ आश्रय करितो, त्याप्रमाणें कांहीं काळ देहाचा आश्रय करावा.—' क्षुत्पर्याप्तं तरुभ्यः पतितफलं अयं भैक्ष्यं अन्नं प्रार्थयेत् '—केवळ क्षुधा शांत होण्यापुरत्या, वृक्षावरून पडलेलीं फळें ( हेंच उत्तम भिक्षान्न ) ह्याच भैक्ष्य अन्नाची त्यानें इच्छा करावी. —' सुखमयं स्वात्मारामं प्रवेष्टुं सः खलु देहतः अपि प्रव्रजेत् '—( आणि शेवटीं ) अत्यंत आनंदमय असा जो स्वतःचा आत्मा त्यामध्यें प्रवेश करण्याकरितां देहापासूनहि निघून जावें. ( देहाभिमान सोडावा. ) [ आतां पूर्वी निर्दिष्ट केलेल्या दोन प्रकारच्या सन्यासाचा अनुवाद करितात— सर्प जसा आपली कात टाकतांना मोठ्या सामर्थ्यानें आपल्या जीर्णत्वचेंतून बाहेर निघतो, त्याप्रमाणेंच जो पुरुष पुत्र, कलत्र इत्यादिकांचे ठिकाणीं अनादिकालापासून प्रेम जडल्यानें त्यांचा त्याग करणें जरी अत्यंत दुर्घट आहे, तरी मोठ्या धैर्यानें त्यांचा व स्वगृहाचा त्याग करून संन्यास करितो आणि ज्याप्रमाणे मार्गस्थ पुरुष मला अद्यापि पुढें जावयाचें आहे, असा विचार करून विश्रांतीकरितां क्षणभर त्या मार्गातील वृक्षछायेचा आश्रय करितो, त्याप्रमाणें परमपुरुषार्थरूपी पुढील गांवाकडे मला जाणें आहे, इकडे लक्ष्य ठेवून त्याच्या उपायांचें अनुष्ठान करण्याकरितां थोडा वेळ म्हणजे प्रारब्ध कर्मांचा क्षय होईपर्यंत तो या शरीराचा आश्रय करितो; तसेंच परम पुरुषार्थाच्या उपायाचें अव्याहत अनुष्ठान व्हावें, म्हणून शरीररक्षण अत्यंत आवश्यक असल्यामुळें क्षुधाशांति होईल इतक्याच, वृक्षांवरून पडलेल्या फलरूपी भिक्षान्नाची अपेक्षा करितो, म्हणजे फलसंग्रहाची इच्छा न ठेवितां वाऱ्याच्या योगानें जीं फळें वृक्षावरून भूमीवर पडलेलीं असतील त्यांच्याच योगानें क्षुधाशांति करून घेतो व स्वतः आपल्या हातानें जो फलच्छेद करीत नाहीं; त्यानें आनंदमय अशा आपल्या स्वतःच्या आत्मारामामध्ये प्रवेश करण्याकरितां म्हणजे स्वस्वरूपाला मिळण्याकरितां गृहाप्रमाणें देहाला सोडून

निघून जावे. देहाच्या ठिकाणचा अभिमान सर्वथैव सोडणें, हाच देहसंन्यास होय. ] १७.

कामो बुद्धावुदेति प्रथममिह मनस्युद्दिशत्यर्थजातं
तद्गृह्णातीन्द्रियास्यैस्तदनधिगमतः क्रोध आविर्भवेच्च ।
प्राप्तावर्थस्य संरक्षणमतिरुदितो लोभ एतत्त्रयं स्यात्
सर्वेषां पातहेतुस्तदिह मतिमता त्याज्यमध्यात्मयोगात् ॥

**अन्वयार्थ**—' इह प्रथमं बुद्धौ कामः उदेति '—या व्यवहारामध्यें प्रथमतः बुद्धींत कामना उत्पन्न होते.—' मनसि अर्थजातं उद्दिशति '—नंतर विषयांविषयीं मनामध्ये पुरुष कल्पना करितो—' तत् इन्द्रियास्यैः गृह्णाति '—ते सर्वहि विषय इंद्रियद्वारा अनुभवितो.—' च तदनधिगमतः क्रोधः आविर्भवेत् '—पण त्यांची प्राप्ति न झाल्यानें क्रोध उत्पन्न होतो.—' च अर्थस्य प्राप्तौ या संरक्षणमतिः स एव लोभः उदितः '—विषयांची प्राप्ति झाली असतां त्यांच्या संरक्षणाविषयींची जी बुद्धि तोच लोभ उत्पन्न झाला ( आहे असे समजावें. सारांश )—' एतत् त्रय सर्वेषां पातहेतु ( स्यात् ) '—हे तिन्ही दोष सर्वांच्या अधःपाताला कारण होतात.—' तत् इह मतिमता अध्यात्मयोगात् त्याज्यं '—म्हणून बुद्धिमान् पुरुषानें आत्म्याकडे लक्ष्य ठेवून त्यांचा त्याग करावा. [ आचार्य आतां ह्या अठराव्या श्लोकांत काम, क्रोध आणि लोभ हे तीन दोष सर्व प्राण्यांना पतित करण्यास कारण होतात, असे सांगतात—प्रथमतः बुद्धीमध्यें विषयाभिलाष उत्पन्न होतो. त्यामुळे मनामध्ये रूप-रसादि विषयांचे चिंतन होते. तदनंतर प्राणी आपल्याला अमुक विषयाची प्राप्ति व्हावी, असा विषयाविषयीं संकल्प करितो. नंतर तो चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा त्या त्या विषयांचें ग्रहण करण्याचा प्रयत्न करितो. ह्याप्रमाणे प्रयत्न करूनहि मध्ये अनेक विघ्नें आल्यामुळे विषयांची प्राप्ति न झाल्यास बुद्धीमध्ये क्रोधाचा प्रादुर्भाव होतो. भगवंतांचेहि "कामात्क्रोधोऽभिजायते" (सु. गीता पृ. ४७) असे वाक्य आहे. दैववशात् विषयांची प्राप्ति झाली असता हा माझा विषय आहे; याचा माझा कधींहि वियोग होऊं नये, अशी किंवा त्याच्या रक्षणाविषयींची जी बुद्धि. तिलाच लोभ म्हणतात. ह्याप्रमाणे काम, क्रोध व लोभ हे तीन दोष सर्वांहि प्राण्यांना अधोगतीला नेण्याला व दुःखरूप संसार देण्याला कारण होतात;

म्हणून बुद्धिमान् पुरुषानें बुद्धीच्याहि पलीकडे असलेल्या आत्म्याकडे अनुसंधान ठेवून म्हणजे मनाचा सर्वहि ओघ निरंतर आत्मचिंतनाकडे लावून या दोषांचा त्याग करावा. ‘ काम, क्रोध व लोभ हें त्रिविध नरकद्वार आहे ’ असें गीतेंतहि म्हटलें आहे. गी. भा. पृ. १०७९ ] १८.

**दानं ब्रह्मार्पणं यत्क्रियत इह नृभिः स्यात्क्षमाऽक्रोधसंज्ञा**
**श्रद्धास्तिक्यं च सत्यं सदिति परमतः सेतुसंज्ञं चतुष्कम् ।**
**तत्स्याद्बन्धाय जन्तोरिति चतुर इमान् दानपूर्वैश्चतुर्भि-**
**स्तीर्त्वा श्रेयोऽमृतं च श्रयत इह नरः स्वर्गतिं ज्योतिराप्तिम् ॥१९**

**अन्वयार्थ**—‘ इह नृभिः यत् ब्रह्मार्पणं क्रियते तत् दानं ’– या मृत्युलोकांत मनुष्ये जे ब्रह्मार्पण करितात त्याला दान,–‘ या अक्रोधसंज्ञा सा क्षमा ’ –ज्याला अक्रोध ही संज्ञा आहे तिला क्षमा,–‘ यत् आस्तिक्यं सा श्रद्धा ’– आस्तिक्य म्हणजे विश्वास हीच श्रद्धा,–‘ यत् सत् तत् सत्यं इति प्रोक्त ’– त्याचप्रमाणे सत्संज्ञक जे ब्रह्म त्याला सत्य, असें म्हणतात. ( हीं चार मुक्तीची साधने आहेत. )–‘ अतःपर चतुष्कं सेतुसंज्ञं ( भवति ), ’–ह्यांच्याहून विरुद्ध असलेलीं जी अदानादिक चार त्यांना सेतु अशी संज्ञा आहे. –‘तत् जन्तोः बन्धाय स्यात् ’–तीं सर्व प्राण्यांना बध उत्पन्न करितात.–‘ (इति हेतोः ) इमान् चतुरः दानपूर्वैः चतुर्भिः तीर्त्वा इह नरः श्रेयः अमृत स्वर्गतिं ज्योतिराप्तिं च श्रयते ’– यास्तव या चार सेतूंचे दानादि चार साधनांनीं उल्लंघन करून पुरुष, मोक्ष, देवत्व (ऊर्ध्वगति) व सूर्य-चंद्रादि ज्योतींची प्राप्ति करून घेतो. [ ह्याप्रमाणें काम-क्रोधादि दैत्यांचा नाश करून देवत्वप्राप्ति करून घ्यावी. ह्याविषयीं सामवेदांतील कल्माषसामाचा अनुवाद करून आचार्य म्हणतात—पुरुष ह्या व्यवहारामध्ये ईश्वराला उद्देशून जो द्रव्याचा व्यय करितात, त्याला दान अशी संज्ञा आहे. तसेंच, दुसऱ्या प्राण्यांनीं आपणाला कितीहि त्रास दिला तरी त्यांच्यावर न रागावणे याला क्षमा असे म्हणतात. तसेंच, श्रुति, स्मृति आणि आचार्य यांनीं सांगितलेल्या अनुष्ठानाचे फल अवश्य मिळेल, असा विश्वास ठेवणें, याला श्रद्धा असें म्हणतात आणि सत्-संज्ञक ब्रह्माला सत्य असें नांव आहे. हीं चार मुक्तीचीं साधनें आहेत. ह्यांच्या विरुद्ध असलेल्या अदान, क्रोध, अश्रद्धा आणि असत्य ह्या चतुष्टयाला सेतु असें नांव आहे. हें सेतुचतुष्टय प्रत्येक प्राण्याला बंध उत्पन्न करितें. ह्या कारणास्तव

ह्यां चार अदानादिक सेतूंचें दानादिक चार मोक्षसाधनांनीं उल्लंघन करून पुरुषार्थप्राप्तीची इच्छा करणारा पुरुष मोक्ष, स्वर्गलोक, देवत्व (ऊर्ध्वगति) आणि चंद्र-सूर्यादिक ज्योति यांची प्राप्ति करून घेतो. परमपूज्य श्रीमच्छंकराचार्यांनीं "हा ३ उ सेतूंस्तर दुस्तरा३न् दानेनादानं हा ३ उ" इत्यादि सामवेदोक्त श्रुतीला अनुलक्षून हा श्लोक लिहिला आहे. त्या श्रुतीचें सर्वहि तात्पर्य या श्लोकांत आले असल्यामुळें ती श्रुति व भाष्य याचे तात्पर्य विस्तारभयास्तव पुनः दिलें नाहीं. ज्याप्रमाणें सेतु पाण्याच्या प्रवाहाला प्रतिबंध करितो, त्याप्रमाणे हे अदानादिक चार सेतु, अखडैकरस ब्रह्मज्ञानाला प्रतिबंध करितात. यास्तव या दुस्तर सेतूंचे मोठया धैर्याने उल्लघन करून पुरुषार्थप्राप्ति करून घ्यावी. भगवताच्या "यत्करोषि यदश्नासि०" (सु. गी. पृ. १७७) म्हणजे जें करतोस, जे खातोस किंवा जेवढी म्हणून क्रिया करितोस तेवढी सर्वहि मला अर्पण कर. इत्यादि वचनाप्रमाणें प्रत्येक पुरुषाने वर्तन केलें असतां अदानादिक सेतूंचे सहजच उल्लंघन होईल. ] १९.

**अन्नं देवातिथिभ्योऽर्पितममृतमिदं चान्यथा मोघमन्नं**
**यश्चात्मार्थं विधत्ते तदिह निगदितं मृत्युरूपं हि तस्य।**
**लोकेऽसौ केवलाघो भवति तनुभृतां केवलादी च यः स्यात्**
**त्यक्त्वा प्राणाग्निहोत्रं विधिवदनुदिनं योऽश्नुते सोऽपि मर्त्यः॥**

**अन्वयार्थः**—'देवातिथिभ्यः अर्पितं इदं अन्नं अमृत (भवति) च अन्यथा मोघ अन्नं (भवति)'—देव किंवा अतिथि यांना अर्पण केलेलें अन्न अमृत होते आणि तद्विपरीत अन्न व्यर्थ होतें—'यश्च आत्मार्थ विधत्ते तत् हि तस्य मृत्युरूप निगदित'—जो केवळ आपल्या स्वत करितां अन्न तयार करितो, तें अन्न त्याच्या मृत्यूसारखे सांगितले आहे.—'लोके य केवलादी स्यात् असौ तनुभृतां केवलाघः (भवति)'—जो पुरुष ह्या जगामध्ये केवळ स्वतःचें उदर भरणारा असतो त्याला सर्व प्राण्यांमध्ये मूर्तिमंत पापाचा पुतळा असे म्हणतात.—'च विधिवत् प्राणाग्निहोत्रं त्यक्त्वा अनुदिन यः अश्नुते सः अपि मर्त्यः'—तसेंच शास्त्रोक्त प्राणाग्निहोत्रादि कर्में न करिता जो प्रतिदिवशीं भोजन करितो तोहि मरणाराच असतो. [ गृहस्थाश्रमाला अवश्य असलेले पंचमहायज्ञ न करितां "ये पचंत्यात्मकारणात्" (सु. गी. पृ. ५८) या भगवद्वचनाप्रमाणें जे स्वतःकरितां अन्न शिजवितात ते पापपुरुष होत, असे येथें सांगितलें आहे.

वैश्वदेवादिक कर्मे करून, अतिथिपूजन करून, देवांना व प्राप्त झालेल्या अतिथींना अन्नसमर्पणानें तृप्त करून नंतर अवशिष्ट राहिलेलें अमृतसंज्ञक अन्न प्रत्येक गृहस्थाने भक्षण करावें, अशी शास्त्रमर्यादा आहे. पण असें न करितां "देवान् भावयतानेन०" (सु. गी. पृ. ५८)–देवांपासून प्राप्त झालेल्या पदार्थांनीं देवांची वृद्धि करा इत्यादि भगवद्वचनाप्रमाणे देवतासंतर्पण न करितां देव व अतिथि यांना फसवून ठेविलेले जे अन्न तें निष्फळ होय. शिवाय पुरुष केवल आपलाच पिंड पुष्ट करण्याकरिता जे अन्न शिजवितो, ते अन्न तर त्याच्या मृत्यूसारखेंच आहे. कारण त्या अन्नाचा दुसऱ्या कोणासहि उपयोग न झाल्यामुळे परिणामीं ते अन्न विषासारखें होत असतें. जो पुरुष स्वतः एकटाच अन्नभक्षण करितो, त्याला केवल पापराशि असे म्हणतात. तसेंच जो पुरुष शास्त्रोक्त पंचमहायज्ञ, अग्निहोत्र इत्यादि नित्यकर्मे न करितां प्रतिदिनीं भोजन करितो तोहि एक दिवस मरणाराच असतो. भगवंतांनींहि "अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति" (सु. गी. पृ. ६०)–तो इंद्रियतर्पक पापी पुरुष ह्या जगांत व्यर्थ जिवंत रहातो, असे म्हटलें आहे. या श्लोकांत आचार्यांनीं "मर्त्य" हा शब्द सहेतुक योजिला आहे. कारण अग्निहोत्रादिक कर्मे ह्या देहाचा त्याग केल्यानंतर उत्तमलोकप्राप्ति करून देत असतात. पण त्याकरितां दुसऱ्या कोणाला अन्न न देतां स्वतःचेंच उदर जो भरतो तोहि शेवटीं मरतोच. त्यामुळें शास्त्रविहित अन्नदान न करितां स्वदेह पुष्ट केल्यानें तो अजरामर होतो, असे मुळींच नाहीं. ] २०.

**लोके भोजः स एवार्पयति गृहगतायार्थिनेऽन्नं कृशाय**
**यस्तस्मै पूर्णमन्नं भवति मखविधौ जायतेऽजातशत्रुः ।**
**सख्ये नाऽन्नार्थिने योऽर्पयाति न स सखा सेवमानाय नित्यं**
**संसक्तायान्नमस्माद्विमुख इव परावृत्तिमिच्छेत्कदर्यात् ॥ २१**

**अन्वयार्थ**—'यः कृशाय गृहगताय अर्थिने अन्न अर्पयति सः लोके भोजः एव'–जो पुरुष कृश होऊन अन्नाकरितां आपल्या घरीं आलेल्या याचकाला अन्न देतो तो भोज (होय)–'तस्मै मखविधौ पूर्ण अन्न भवति अजातशत्रुः (च) जायते'–त्याला यज्ञामध्यें अन्नाची कधीं उणीव पडत नाहीं व तो अजातशत्रु होतो. (म्हणजे त्याला कोणी शत्रुहि उत्पन्न होत नाहीं.)–'नित्यं संसक्ताय सेवमानाय अन्नार्थिने सख्ये यः अन्नं न अर्पयति सः न सखा'–

तसेंच जो सर्वदा आपल्या आश्रयानें रहाणाऱ्या, सेवा करणाऱ्या, अन्नाची याचना करणाऱ्या मित्राला अन्न देत नाहीं तो त्याचा सखा नव्हे.–'अस्मात् कदर्यात् विमुखः इव परावृत्ति इच्छेत्'–अशा कृपणापासूनच याचक विमुख झाल्याप्रमाणे दुसऱ्या दात्याकडे जाण्याची इच्छा करतो. [आपल्याकडे कोणीहि याचक आला असता त्याची इच्छा पूर्ण करणारा भोज होय, असे "स इद्भोजो यो गृहवे ददात्यन्नम्" इत्यादि श्रुतीच्या आधाराने सांगतात. दारिद्र्याने अत्यत कृश होऊन याचना करण्याकरिता आपल्या घरीं आलेल्या पुरुषाला जो शरीरस्वास्थ्याकरितां अत्यंत अवश्य असलेले अन्न देतो, तो ह्या जगामध्ये खरा भोज (अन्नदाता) होय. त्याला यज्ञादिक कृत्यामध्ये कधींहि अन्नाची तूट पडत नाहीं. वस्तुत यज्ञादिक कृत्यामध्ये अन्नाचा पुरवठा होणे अत्यंत अशक्य असते. कारण त्यावेळी कितीहि जरी याचक आले तरी कोणालाहि विमुख होऊ न देतां यजमानाने मिष्टान्नसतर्पणाने त्यांना तृप्त करावे, असें विधान आहे. पण अशा प्रसगीहि दात्या पुरुषाला अन्नाची उणीव पडत नाही. तसेच हा दाता सर्वहि प्राण्याना यथेच्छ अन्नदान: करून त्याच्या ठिकाणच्या देवताना तृप्त करीत असल्यामुळे त्याला कधीच कोणी शत्रु उत्पन्न होत नाहीं. ह्या व्यवहारात सुद्धा जो कधी कोणाचा द्वेष किवा हेवा करीत नाहीं त्याला पुष्कळ मित्र असतात, असा अनुभव आहे. आता याच्या उलट प्रकार कसा होतो, ते दाखवितात. जो पुरुष अन्नाची इच्छा करून सतत सेवा करण्याकरिता आपला आश्रय करून राहिलेल्या आपल्या मित्राला अन्न देत नाहीं तो जगांत कोणाचाहि मित्र होत नाहीं. तर तो पिशुन होतो. सारांश—आपली सेवा करून केवळ आपल्यावरच अवलंबून राहिलेल्या दरिद्री मनुष्याला जो अन्न देत नाही, तो इतरांना काय देणार? या श्लोकामध्ये अर्थी पुरुषाला उद्देशून 'सख्ये' असे पद घातले आहे. त्याचा हेतु असा कीं अर्थी पुरुष दात्याला स्वर्ग देत असतो (म्हणजे उत्तम पद प्राप्त करून देतो) म्हणून तो मित्र होय. पण ह्या कृपण पुरुषापासून इच्छा पूर्ण न झाल्या मुळे याचक विमुख होऊन आपले दुष्कृत्य त्याला देऊन व त्याचे सुकृत घेऊन दुसऱ्या दात्याकडे याचनेस्तव जातो. "अतिथिर्यस्य भग्नाशो गृहात्प्रतिनिवर्तते। स तस्मै दुष्कृतं दत्वा पुण्यमादाय गच्छति" असे स्मृतिवचनहि आहे.] २१.

**स्वाज्ञानज्ञानहेतू जगदुदय-लयौ सर्वसाधारणौ स्तो**
**जीवेष्वास्वर्णगर्भं श्रुतय इति जगुर्हूयते स्वप्रबोधे।**

**विश्वं ब्रह्मण्यबोधे जगति पुनरिदं हूयते ब्रह्म तद्व-**
**च्छुक्तौ रौप्यं च रौप्येऽधिकरणमथवा हूयतेऽन्योन्यमोहात् ॥**

**अन्वयार्थ**—'आस्वर्णगर्भ जीवेषु स्वाज्ञानज्ञानहेतू जगदुदय-लयौ सर्व-साधारणौ स्तः इति श्रुतयः जगुः '—हिरण्यगर्भापर्यंत सर्वांहि जीवाचे ठिकाणीं, आत्म्याचे अज्ञान व ज्ञान यांच्या योगाने होणारे जगाचे उदय आणि प्रलय सर्वसाधारण आहेत, असे श्रुति प्रतिपादन करितात.-'यद्वत् च शुक्तौ रौप्यं अथवा रौप्ये अधिकरणं अन्योन्यमोहात् हूयते तद्वत् स्वप्रबोधे विश्वं ब्रह्मणि हूयते '—ज्याप्रमाणें एकमेकांविषयीं मोह पडल्याने शुक्तीच्या ठिकाणीं रौप्य अथवा रौप्याच्या ठिकाणी अधिकरणभूत शुक्ति यांचा उदय होतो, त्याप्रमाणे आत्मज्ञान झाले असता विश्व ब्रह्माचे ठिकाणी लीन होते—'अबोधे पुनः इदं ब्रह्म जगति हूयते '—पण स्वतःचे ज्ञान जेव्हां नसते त्यावेळीं हे ब्रह्म जगामध्ये लोपून जाते. [ जगाची व्यक्तावस्था व अव्यक्तावस्था म्हणजेच उत्पत्ति व प्रलय आहेत व ते आत्म्याचें अज्ञान व ज्ञान यांच्या द्वारा होत असतात. असे या श्लोकात आचार्यांनीं व्यक्त केले आहे. आब्रह्मस्तबपर्यंत सर्वांहि जीवांना आत्म्याचे ज्ञान व आत्म्याचे अज्ञान ह्या दोन कारणांनी अवश्य होणारे जगाचे उदय व अस्त सर्वसाधारण आहेत, असे श्रुति प्रतिपादन करितात, आत्मज्ञानाच्या योगाने जगाचा लय व आत्म्याच्या अज्ञानाने त्याचा उदय होत असतो. हिरण्यगर्भ सुद्धा स्वतःचे स्वरूप विसरून जाऊन 'मी ईश्वर आहें; मी ह्या अखिल सृष्टीचा नियता आहे ' असा अभिमान धरितो व त्यावेळीं तो हे सर्व जगत् उत्पन्न झाले आहे, असे पहातो. तसेच ज्यावेळी 'मी नित्यशुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभाव ब्रह्म आहे ' अशा ज्ञानाने स्वतःच्या स्वरूपामध्ये तो लीन होतो त्यावेळीं ह्या सर्व विश्वाच्या आभासाचाहि लय होतो. म्हणजे ज्या वेळीं जीव बहिर्दृष्टि होतो त्यावेळी त्याला जगाचा अनुभव येत असल्यामुळे त्याचा उदय होतो व ज्यावेळीं जीव अतर्दृष्टि होतो त्यावेळीं त्याला जगाचा अनुभव येत नसल्यामुळे त्याचा लय होतो, असे म्हणतात. असे हे जगाचे उदय व प्रलय सर्व जीवांचे ठिकाणी समानच आहेत. ज्याप्रमाणें शिपी व रुपे ह्यांपैकीं एकाचेहि यथार्थ ज्ञान न झाल्यामुळे शिपीच्या ठिकाणीं रुप्याचा भास होतो, व त्यावेळीं रुप्यामध्ये शिंपीचा लय होतो; पण भ्रमनिवृत्ति झाली असतां भ्रमाला कारण होणाऱ्या शिंपीचे ज्ञान झाल्यानें पूर्वी भासलेल्या रुप्याचा त्या शिंपीत लय होतो. म्हणजे शुक्तीच्या अज्ञानाने रजताचा उदय व तिच्याच

ज्ञानानें रजताचा नाश होतो त्याचप्रमाणें आत्म्याचे ज्ञान झालें असतां ब्रह्माच्या ठिकाणीं विश्वाचा लय होतो व आत्म्याच्या विस्मृतीनें तेच अधिष्ठान-भूत ब्रह्म जगामध्यें लोपून जातें. ] २२.

**तुच्छत्वान्नासदासीद्गगनकुसुमवद्भेदकं नो सदासीत्**
**किंत्वाभ्यामन्यदासीद्व्यवहृतिगतिसन्नास लोकस्तदानीम् ।**
**किंत्वर्वागेव शुक्तौ रजतवदपरो नो विराड् व्योमपूर्वः**
**शर्मण्यात्मन्यथैतत्कुहकसलिलवत्किं भवेदावरीवः ॥ २३**

**अन्वयार्थ**—' गगनकुसुमवत् तुच्छत्वात् असत् न आसीत् '–( सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी ) आकाशांतील पुष्पाप्रमाणे तुच्छ असणारे असत् नव्हते–'भेदकं ( च ) सत् नो आसीत् । किंतु आभ्यां अन्यत् आसीत् '–व भेद करणारें सत्‌हि नव्हते. पण ह्या दोघांहूनहि अन्य असे होतें–' तदानीं लोकः व्यवहृति-गतिसन् न आस '–व्यावहारिक सत् सुद्धां त्या काळीं नव्हते.–'अपरः व्यो-मपूर्वः विराट् नो–' आकाश व त्याचे कार्य विराट्, ह्यांतीलहि कांहीं नव्हते. '–किंतु शुक्तौ रजतवत् अर्वाक् एव'–परंतु शिपीच्या निमित्तानें तिच्या ठिकाणीं जसें रुपे भासावें, तसे ( सृष्टीनंतरच हें सर्व भासत आहे ) '–अथ शर्मणि आत्मनि कुहकसलिलवत् आवरीवः भवेत् किं [ नेत्यर्थः ] '–पण शुद्ध ब्रह्माला मृगजलासारखे हे जगत् झांकील काय ? ( कधींही नाहीं. ) [ ह्या नाम-रूपात्मक व प्रत्यक्ष दिसणाऱ्या जगाचे उपादान कारण काय असावें ? असा विचार करूं लागले असतां शुद्ध व निष्क्रिय ब्रह्म कधींहि जगाचें कारण होणार नाहीं; असें वाटतें. बरें ब्रह्माहून अन्य असे कांहीं जगाचे कारण असावें, अशी कल्पना केल्यास ते सत् ( भूत, भविष्य, वर्तमान कालीं रहा-णारे ) कीं असत् ( कांहीं काल भासणारे ) आहे, अशी शंका येते. यास्तव त्याचा निर्णय या श्लोकांत केला आहे. ज्या द्रव्याचें कार्य झालेलें असते, ते द्रव्य त्या कार्याचे उपादान कारण होय. मातीचा घट, माती ह्या द्रव्यानें बनविलेला असतो; म्हणून ती घटाचे उपादान कारण आहे. तसेंच ह्या जगाचें उपादान कारण काय असावें ? आकाशाच्या पुष्पाप्रमाणें किंवा मनु-ष्याच्या शिंगाप्रमाणें कधींहि नसणारे असत् ( म्हणजे शून्य ) या सद्रूपानें भासणाऱ्या जगाचें कारण होऊं शकणार नाहीं. बरें सत् असें कांहीं जगाचें कारण म्हणावे तर सद्रूप असा एक नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभाव परमात्माच आहे;

अन्य कांहींहि सत् नाहीं, असा श्रुतिसिद्धान्त आहे व जगाचे कारणहि सत् आहे, असे मानल्यास ते सत् ब्रह्मस्वरूपामध्ये भेद पाडील म्हणजे श्रुतीविरुद्ध शुद्ध ब्रह्माहून पृथक् असे एक निराळेंच जगाचे कारण 'सत्' आहे, असे होऊं लागेल. पण ते इष्ट नाहीं. म्हणून ब्रह्मस्वरूपांत भेद पाडणारे सत्हि जगाचे कारण नव्हे. तर सत् व असत् ह्याहून विलक्षण असे जगाचे कारण आहे. कार्याच्या पूर्वी कारण असते; हे सुचविण्याकरितां लोकामध्ये 'आसीत्' इत्यादि भूतकालिक क्रियापदे योजून जगाचे पूर्वरूप (कारण) सदसत्पेक्षां विलक्षण होते, असे प्रतिपादन केले आहे. पारमार्थिक सत् जरी पूर्वी नसलें तरी व्यावहारिक सत् तरी तेव्हां असेल, असे कोणी म्हणतील; म्हणून व्यावहारिक सत्हि जगाच्या उत्पत्तीपूर्वी नव्हते, म्हणजे त्याकालीं (सृष्टीच्या पूर्वी) व्यवहार नव्हता. तो ह्या स्थित्यवस्थेमध्येच आहे, असे आचार्य 'व्यवहृतिगति०–' इत्यादि पदानीं सागतात. आता यावर जरी कदाचित् साकार असे त्यावेळीं कांही नव्हते तरी निराकार आकाश व आकाशादिभूतांपासून होणारा विराट् तरी असेल, अशी तार्किक शका घेतील, म्हणून आकाश विराट इत्यादि काही नव्हते, असे अनेक श्रुतीना अनुसरून आचार्यांनी येथे सांगून ठेविले आहे. पुनः यावर–पूर्वी नसून हे जगत् मध्ये कां उत्पन्न झालेले असेना पण ते शुद्ध ब्रह्माहून पृथक् असल्यामुळे त्या ब्रह्माला आच्छादित तरी करील म्ह० त्याचें ज्ञान होऊ देणार नाही, असे कोणी म्हणेल म्हणून, चवथ्या चरणांत त्याचाहि निषेध केला आहे. ज्याप्रमाणे माळ जमिनीवर भ्रमाने जलाचा भास होतो, पण तो भ्रम नष्ट झाल्यावर त्या भूमीला ते भासणारे जल आच्छादित करीत नाही, त्याप्रमाणे शुद्ध ब्रह्मालाहि हे मायेने काही काल भासणारे जगत् आवृत करूं शकत नाहीं. ] २३.

**बन्धो जन्मात्ययात्मा यदि न पुनरभूत्तर्हि मोक्षोऽपि नासी-**
**द्यद्वद्रात्रिर्दिनं वा न भवति तरणौ किंतु दृग्दोष एषः ।**
**अप्राणं शुद्धमेकं समभवदथ तन्मायया कर्तृसंज्ञं**
**तस्मादन्यच्च नासीत्परिवृतमजया जीवभूतं तदेव ॥२४**

**अन्वयार्थ**—'यद्वत् रात्रिः दिनं वा तरणौ न भवति किंतु एषः दृग्दोषः'–ज्याप्रमाणे रात्र किंवा दिवस सूर्याच्या स्वरूपांत होत नसून तो केवळ दृष्टीचा दोष आहे;–' तद्वत् जन्मात्ययात्मा बन्धः यदि न अभूत् तर्हि मोक्षः अपि

पुनः न आसीत्'—त्याचप्रमाणें जन्म-मरणरूप बंध जर नसला तर पुनः मोक्षहि नाहीं.—' अप्राणं शुद्धं एकं समभवत् '—सृष्टीपूर्वी प्राणरहित, शुद्ध व एक असें तत्त्व होतें.—' अथ मायया तत् कर्तृसंज्ञं '—पुढें मायेने तेंच कर्ता झालें '—च तस्मात् अन्यत् न आसीत्—' व त्याहून अन्य असें दुसरें कांहीं नव्हतें. '—तत् एव अजया परिवृतं जीवभूतं ( अभूत् ) '—तेंच कर्तृसंज्ञक तत्त्व मायेनें वेष्टित झाल्यानें जीव झाले. [खरोखर पाहतां ब्रह्मस्वरूप असलेल्या जीवांना बंधहि नाहीं व मोक्षहि नाहीं. ते केवळ अज्ञानामुळें आत्म्याचे ठिकाणीं कल्पित आहेत, असें ह्या श्लोकांत सांगितले आहे. ' बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो मे न तत्त्वतः—' बद्ध व मुक्त ह्या संज्ञा मला सत्त्वादि गुणतः—गुणद्वारा ( किंवा गौण वृत्तीनें ) प्राप्त होतात, त्या खऱ्या नव्हेत. ह्या वचनाप्रमाणें जन्म-मरणरूप बंध जेव्हां नव्हता तेव्हां मोक्षहि नव्हता. कारण बधामुळे मोक्ष होतो. कोणीच जर बद्ध नाहीं तर मुक्त कोण होणार ? सृष्टीच्या पूर्वी एकच वस्तु असल्या-मुळें व त्याहून अन्य कांहींच नसल्यामुळे बद्ध किंवा मुक्त ( मोकळा ) तरी कोण होणार ? हीच गोष्ट सूर्याचा दृष्टान्त देऊन जास्त स्पष्ट करितात. सूर्याच्या ठिकाणीं रात्र व दिवस नसतात म्ह० त्यांचा सूर्याशीं कांहीं संबध नसतो. पण लोकांना सूर्याचें दर्शन जेव्हां होते त्या वेळीं आतां दिवस आहे व तो दिसेनासा झाला कीं आता रात्र आहे, असे ते म्हणतात. तात्पर्य—रात्र किंवा दिवस हे धर्म सूर्याचे नसतांना लोकांच्या नेत्रदोषाने ते त्याचे आहेत, असें भासते. त्याचप्रमाणे बध व मोक्ष हे आत्मरूप शुद्ध ब्रह्माला नसून ते त्यालाच आहेत, असे अविद्यादोषाने वाटतें. शुद्ध ब्रह्माचा प्राणाशीं संबध नसतो म्हणजे तें क्रियाशक्तिरहित आहे, म्हणूनच त्याला प्राणरहित, शुद्ध व एक अशीं विशेषणें दिलीं आहेत. असे ते अद्वितीय ब्रह्मच स्वाज्ञानसंज्ञक मायेने हिरण्य-गर्भनामक जगत्कर्ता होतें. पूर्वी त्याहून अन्य काहीं नव्हतें आणि तेंच जन्म-रहित मायेने आच्छादित झालें असतां जीव झालें. सारांश—जीवहि वस्तुतः त्या शुद्ध तत्त्वाहून पृथक् नाहीं. केवळ आत्म्याच्या अज्ञानानें जीव, ईश्वर, जगत् व सर्व पदार्थ यांचा अनुभव येत असतो; पण तो वस्तुभूत ( खरा ) नव्हे, प्रातिभासिक आहे. खरें तत्त्व एक व अद्वितीय असे असून तेंच सत्य ( त्रिकाला-बाधित ) आहे. ] २१.

**प्रागासीद्भावरूपं तम इति तमसा गूढमस्मादतर्क्यं**
**क्षीरान्तर्यद्वदम्भो जनिरिहजगतो नाम-रूपात्मकस्य ।**

**कामाद्धातुः सिसृक्षोरनुगतजगतः कर्मभिः संप्रवृत्ता-**
**द्रेतोरूपैर्मनोभिः प्रथममनुगतैः संततैः कार्यमाणैः ॥२५**

**अन्वयार्थ—**' प्राक् भावरूपं तम इति आसीत्–' पूर्वी भावरूप अज्ञान होतें.–' तमसा गूढं अस्मात् अतर्क्यं (किंवत्) यद्वत् क्षीरान्तः अम्भः'– दुधांतील पाण्याप्रमाणें अज्ञानाने हे आच्छादित असल्यामुळें अतर्क्य होतें. '–अनुगतजगत' रेतोरूपै' मनोभिः प्रथम अनुगतैः संततै' कार्यमाणैः कर्मभिः संप्रवृत्तात् सिसृक्षोः धातुः कामात् नाम-रूपात्मकस्य जगतः इह जनिः '–अनादि कालापासून चालत आलेल्या, तसेच अनादि कालापासून प्रवृत्त झालेल्या आणि प्रवाहाप्रमाणें सतत चालू असणाऱ्या, बीजभूत सृष्टीच्या कर्मांनीं प्रेरित झाल्यामुळे सृष्टि करण्याची इच्छा करणाऱ्या प्रजापतीच्या कामनेने नाम-रूपांनीं युक्त असलेल्या ह्या जगाची उत्पत्ति (होते.) [ मागच्या श्लोकामध्यें सृष्टीच्या पूर्वी जगत् नव्हते, असे सांगितले आणि आतां हें व्यक्त जगत् कसे उत्पन्न झालें किंवा सृष्ट्युत्पत्तीच्या पूर्वी हे कोणत्या अवस्थेंत होते, हें स्पष्ट सांगतात—हे जगत् व्यक्त होण्यापूर्वी त्याचे उपादानरूप तम या नांवाचे अज्ञान होतें. त्या तमाने हे जगत् आच्छादित झालेलें होते व त्यामुळे दुधामध्यें असणाऱ्या उदकाचे जसे ज्ञान होत नाही, तसे जगाचे ज्ञान तेव्हा होत नव्हतें. नंतर त्या अज्ञानापासूनच ह्या नामरूपाने व्यक्त होणाऱ्या जगाची उत्पत्ति झाली. ज्याप्रमाणे बीजामध्ये वृक्ष गूढ असतो तरी तो व्यक्त होण्यास भूमि, उदक, बीजारोपण करणारा इत्यादि निमित्त कारणे लागतात, त्याचप्रमाणे हें जगत् तमामध्यें गुप्त असते व ते व्यक्त होण्यास सृष्टीला उत्पन्न करण्याची इच्छा करणाऱ्या प्रजापतीच्या इच्छेची आवश्यकता असते. अनादि कालापासून प्रवृत्त झालेल्या ह्या जगांतील अनंत प्राण्यांच्या कर्मांनीं प्रजापतीला जगत् उत्पन्न करावे, अशी इच्छा होते आणि तीं कर्में बीजरूप, अनादिकालापासून चालत आलेलीं, सद्रूप व सतत निष्पन्न होणारीं अशीं असतात. म्हणजे तींच पुनरुत्पत्तीला कारण होतात. हा संसार अनादि असल्यामुळें त्यांतील प्राण्यांचीं संचित कर्मेंहि अनादि आहेत. तीं सद्रूप साक्षी जो आत्मा त्याच्या आश्रयाने असतात. म्हणून त्यांनाहि सद्रूप म्हटलें आहे. प्रवाहरूपाने तीं एकसारखीं प्रत्येक संसारामध्यें प्रवृत्त होतात; प्रत्येक नवीन जन्मामध्यें नवीन कर्मांची भर पडते व ज्ञानावांचून त्यांचा कधीहि क्षय होत नाहीं. म्हणून त्यांना 'संततैः' व 'कार्यमाणैः' अशीं विशेषणें दिलीं आहेत.

हा श्लोक, श्रीमदाचार्यांनीं 'तम आसीत्तमसा गूढमग्रे॰' ह्या श्रुतीच्या आधाराने लिहिला आहे. ह्या श्रुतीच्या भाष्याचे सर्व तात्पर्य येथे दिल्यास चर्वितचर्वण होईल. कारण त्यांतील बहुतेक भाग वर येऊन गेलाच आहे. यास्तव श्लोकाचा अर्थ विशेष स्पष्ट होण्याकरितां काहीं भाग येथें घेतला आहे.

श्रुतीमध्यें पूर्वी हें जगत् नव्हते असे सांगितले आहे. पण यावर तार्किक अशी शंका घेतात कीं, 'पूर्वी जर हे जगत् नव्हते तर त्याची उत्पत्ति कशी झाली व उत्पन्न होणाऱ्या ह्या जगाची उत्पत्ति करणारा कोण? कारण, कर्ता हे एक कारक§ आहे व कारक हा एक कारणाचाच विशेष आहे व कारण तर कार्योत्पत्तीच्या पूर्वी अवश्य विद्यमान असावेंच लागते.' ह्या शंकेचे निरसन करण्यासाठीं उत्पत्तीच्या पूर्वीहि हें जगत् एका विशेष रूपाने असतेंच, असे श्रुति सांगते. पूर्वी म्हणजे प्रलयकाली हीं सर्व आकाशादि भूते व त्याच्यापासून होणारे पदार्थ यांना तमाने (अंधकाराने) झांकून टाकिलें होते. जसा रात्रींतील अंधकार सर्व पदार्थांना व्यापून सोडतो व त्यामुळे त्यांचें ज्ञान होत नाहीं, त्याचप्रमाणे मायासंज्ञक भावरूप अज्ञानाने आत्मतत्त्वाला झाकून टाकिले. म्हणूनच त्याला 'तम' असे म्हणतात. त्याच कारणभूत तमामध्ये हे सर्व जगत् गुप्त असते. त्या तमापासून ह्या नाम व रूप यांनी युक्त असलेल्या जगानें व्यक्त होणे हीच याची उत्पत्ति होय व हे आत्माच्छादक अज्ञानच त्याला उत्पन्न करते. 'सृष्टि उत्पन्न (म्हणजे व्यक्त) करावी' अशी ईश्वराला इच्छा होते व ह्या इच्छेला अनंत प्राण्यांच्या अनंत वासना हेच कारण होते. पूर्व कल्पामध्ये प्राण्यानी केलेल्या कर्मांचे फळ त्यांना मिळण्याची वेळ आली की कर्माध्यक्ष ईश्वराला सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा होते व त्याच्या इच्छाशक्तीनेच ही सृष्टि व्यक्त होते. ही गोष्ट अनुभवगम्य आहे; यास्तव साधकानी अनुभवी पुरुषांपासून ती समजून घ्यावी. ] २५.

**चत्वारोऽस्याः कपर्दा युवतिरथ भवेन्नूतना नित्यमेषा**
**माया वा पेशला स्यादघटनघटनापाटवं याति यस्मात् ।**
**स्यादारम्भे घृतास्या श्रुतिभववयुनान्येवमाच्छादयन्ती**
**तस्यामेतौ सुवर्णाविव परपुरुषौ तिष्ठतोऽर्थप्रतीत्या ॥ २६**

§—कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान व अधिकरण हीं सहा कारकें होत. यांचा कोणत्याहि क्रियानिष्पत्तीशीं संबंध असतो, असें व्याकरणामध्यें सांगितलें आहे.

**अन्वयार्थ**—' अस्याः चत्वारः कपर्दाः ( सन्ति ) '–ह्या मायेचे चार उत्कर्ष आहेत ( ते असे— ) ' अथ एषा माया नित्यं नूतना ( अतः ) युवतिः भवेत् '–१ ही माया नित्य नूतन ( तरुणी ) असते म्हणून ही युवति होय.– ' यस्मात् अघटनघटनापाटव याति तस्मात् पेशला वा '–२ ज्याअर्थी ही अत्यंत दुर्घट अशीं कृत्यें करिते त्याअर्थी ही अति कुशल आहे.–' आरंभे घृतास्या स्यात् '–३ प्रथमतः ही मोठी रमणीय वाटते. –' एवं श्रुतिभवत्वयुनानि आच्छादयन्ती '–४ व उपनिषदांतील प्रतिपादनाला [ ही आपल्या शक्तीने ] झाकून टाकिते.–' तस्या अर्थप्रतीत्या एतौ परपुरुषौ सुपर्णौ इव निश्रतः '–तसल्या ह्या मायेमध्ये दोन पक्ष्याप्रमाणे जीव व शिव हे दोघे विषय भोगीत राहतात. [ ह्या श्लोकांत, पूर्व श्लोकांत सांगितलेल्या 'तम'नावाच्या ह्या मायेचे चार उत्कर्ष आहेत, असे प्रतिपादन केले आहे. जी ही माया आपल्या विलक्षण शक्तीने हे सर्व जगत् निर्माण करून पुनः त्याचा लय करिते तिचे चार उत्कर्ष [ मुख्य गुण ] आहेत. १ ही सर्वदा नवी असते. ती कधीच वृद्ध होत नाहीं. यास्तव विद्वान् तिला **युवति** असे म्हणतात. २ ही फार कुशल आहे. कारण अति दुर्घट विलक्षण असे कृत्य करण्यात ही मोठी पटु आहे. ही माया चैतन्य व जड पदार्थ यांचें ऐक्य [ तादात्म्य ] करून दाखविते. पण हे कृत्य प्रकाश व अंधकार यांचे ऐक्य करून दाखविण्याइतके विलक्षण व अलौकिक आहे. म्हणून वस्तु एकप्रकारची असतां ती भलत्याच प्रकारची करून दाखविण्यात ही माया फार चतुर असल्यामुळे हिला ' **कुशल** ' असे म्हणतात. ३ ही सकृद्दर्शनी पुरुषाला मोठी रमणीय वाटते. पण परिणामी त्याला मोठ्या अनर्थांत पाडिते. विषय दुःख देणारे असून ते प्रथमतः किती सुखकर वाटतात ! पण मोठ्या आनंदाने केलेल्या दुष्कृत्यांचे परिणाम जेव्हां रडत भोगावे लागतात, तेव्हा त्याचे खरे स्वरूप समजते. ही सर्वदा आपल्या मोहक रूपाने सर्व प्राण्यांना मोह पाडून आपल्या अधीन करून घेते व नंतर त्यांना जन्ममरणगर्तेंत ( खड्डयांत ) लोटते, यास्तव हिला ' **घृतास्या** ' ( तुपानें माखलेल्या तोंडाप्रमाणे रमणीय दिसणारी ) असे म्हणतात. ४ उपनिषद्भागामध्ये सर्वत्र जो उपदेश व प्रतिपादन केलेले आहे त्याला आवरण घालून म्हणजे आपल्या मोहक रूपाने प्राण्यांना भुलवून " उपनिषदांतील सर्व प्रतिपादन खोटे आहे त्यांत काहीं तथ्य नाहीं, ती सर्व पोटभरू ठक ब्राह्मणांची जगाला फसविण्याची विद्या आहे " असें भासवितें. असे हे हिचे चार उत्कर्ष असून दोन पक्षी ज्याप्रमाणें एका वृक्षाचा किंवा एका

शाखेचा आश्रय करून राहतात, त्याप्रमाणें जीव व शिव हे दोघे विषयांचा अनुभव घेत हिचा आश्रय करून रहातात; माया जड असल्यामुळें ती कोणत्याहि पदार्थाचें ज्ञान करून देत नाहीं, तर अंधकाराप्रमाणे सर्व पदार्थांना झांकून टाकीत असते व परमात्मा चिद्रूप असल्यामुळे सर्व पदार्थांना प्रकाशित करितो. ( म्ह० त्याचे ज्ञान करून देतो. ) प्रथम उत्कर्षाने ह्या मायेचें सर्वदा एकरूप, द्वितीय उत्कर्षाने हिची विक्षेपशक्ति, तृतीय उत्कर्षाने हिचें मोहकत्व व चतुर्थाने हिची आवरणशक्ति व्यक्त करून दाखविली आहे. अंधाऱ्या रात्रीं पुढे असलेला वृक्ष मुळींच दिसत नाहीं हे आवरण व तो अंधुक दिसत असल्यामुळे हा कोणी पुरुष किंवा पिशाच आहे, असे वाटते, हा विक्षेप; म्हणजे पदार्थाचे मुळींच ज्ञान न होऊं देणे याला आवरण व तो मूळ पदार्थाहून भलताच कांहीं पदार्थ आहे, असे भासविणे याला विक्षेप असें म्हणतात. माया आपल्या आवरणशक्तीने आत्म्याचे स्वरूपज्ञान होऊं देत नाहीं व विक्षेपशक्तीने देह हाच आत्मा आहे, असे किंवा तो सुखी आहे, दुःखी आहे, कुरूप आहे इत्यादि भासविते. जीव हा भोग भोगणारा व शिव भोग भोगविणारा होय. मायेच्या योगानेच हे दोन भेद झाले आहेत. ही माया शुद्ध चैतन्याला जीव बनविते व ते चैतन्य ह्या मायाकरून जीवांचा कर्मफलदाता ईश्वरहि हिच्यामुळेच होते. ] २६.

एकस्तत्रास्त्यसङ्गस्तदनु तदपरोऽज्ञानसिन्धुं प्रविष्टो
विस्मृत्यात्मस्वरूपं स विविधजगदाकारमाभासमैक्षत् ।
बुद्ध्यान्तर्यावदैक्षद्विसृजति तमजा सोऽपि तामेवमेक-
स्तावद्विप्रास्तमेकं कथमपि बहुधा कल्पयन्ति स्ववाग्भिः ॥

**अन्वयार्थ**—' तत्र एकः असङ्गः अस्ति '—त्या दोघांपैकीं शिव कोठेहि आसक्त होत नाहीं;—'तदनु तदपरः अज्ञानसिन्धु प्रविष्टः '—पण त्याच्याचसारखा असणारा दुसरा जो जीव तो अज्ञानसागरांत बुडाला आहे.—' सः ( च ) आत्मस्वरूपं विस्मृत्य विविधजगदाकारं आभासं ऐक्षत्–' तो स्वतःचेच स्वरूप विसरून नानाप्रकारच्या आकारांनीं युक्त असलेला हा जगाचा भास पाहूं लागला.—' यावत् बुद्ध्या अन्तः ऐक्षत् तावत् तं अजा विसृजति सः अपि तां ( विसृजति इति ऐक्षत् )–पण ( ह्या जगदाकारावरून क्षणभर लक्ष

काढून ) तो आपल्या ह्या हृदयांत जों बुद्धिद्वारा पाहूं लागला तों ही माया जीवाला उत्पन्न करिते व जीव हिला उत्पन्न करितो, असे त्याला दिसलें.— ‘ एवं एकः तावत् ( अस्ति तथापि ) विप्राः त एक कथ अपि स्ववाग्भिः बहुधा कल्पयन्ति ’—ह्याप्रमाणे तो एकच आहे; पण ब्राह्मण त्या एकाच विषयीं कशी तरीं आपल्या वाणीने अनेक प्रकारची कल्पना करितात. म्ह० तो एक असतांना त्याच्या ठिकाणी अनेकत्वाचा आरोप करितात. [ जीव व परमात्मा हे व्यवहारतः भिन्न भिन्न भासले तरी परमार्थतः ते एकच आहेत, असे ह्या श्लोकांत सांगितलें आहे. पक्ष्यांप्रमाणे मायेचा आश्रय करून राहणाऱ्या त्या जीव-शिवांपैकीं शिव कोठेच आसक्त न होतां मायेला स्वाधीन ठेवून भोक्त्याला कर्मफळे देत असतो व वस्तुतः त्याच्याच सारखा असणारा दुसरा जीव अज्ञान-समुद्रात बुडून व्याकुळ होतो. तो स्वतःचेच स्वरूप विसरून जाऊन नाना-प्रकारच्या व विलक्षण आकृतीच्या ह्या जगाचा अनुभव घेऊ लागतो. म्ह० ह्या बाह्य अनात्मभूत सृष्ट पदार्थांमध्येच तो गर्क होऊन रहातो. त्याला स्वतःचें भानहि नाहींसे होऊन तो जड पदार्थांतीलच एखाद्याला ‘ हा मी ’ असे खोटेंच समजतो. पण दैववशात् एखादे वेळीं वैषयिक दृष्टि सोडून अंतर्दृष्टीने व सूक्ष्म बुद्धीने जर आपल्या अंतःकरणातच काय भरले आहे ह्याचा त्याने विचार केला, तर माया जीवाला निर्माण करिते व जीव मायेला उत्पन्न करितो ( म्ह० माया ज्याला केवळ कल्पनेने बनविते तो व ती स्वतः ज्याच्या आधाराने आहे तो, असे हे दोघे पृथक् नसून एकच आहेत ) असा त्याला अनुभव येतो. मायेचा व जीव-शिवाचा खरोखर कांहींच संबंध नाहीं, असे त्याला निश्चयपूर्वक कळून आल्याने चित्स्वरूपाने जीव व शिव असा खंड नसून ते अखंड एकरूपाने आहे, असा त्याला दृढ प्रत्यय येतो. वस्तुतः अशी जरी स्थिति आहे तरी वेद-वेदांगपारग विद्वान् ब्राह्मण, शिष्यांना बोध होण्यासारखा शब्दव्यवहार करितां यावा म्हणून, केवल शब्दांनीं त्या एकच असणाऱ्या परमात्म्याला अनेक नावें देऊन त्याचीं अनेक रूपे आहेत, अशी कल्पना करितात; पण तें खरें नव्हे. भगवान् आचार्यांनीं ह्या व मागच्या श्लोकात, ‘ चतुष्कपर्दा युवतिः सुपेशा......विचष्टे ’ इत्यादि श्रुतीचा अर्थ, स्पष्टपणें आणिला आहे. ] २७.

**नायाति प्रत्यगात्मा प्रजननसमये नैव यात्यन्तकाले**
**यस्मोऽखण्डोऽस्ति नैकं मन इह विशति प्रव्रजत्यूर्ध्वमर्वाक् ।**

**तत्कार्श्यं स्थूलतां वा न भजति वपुषः किंतु संस्कारजातै-**
**स्तेजोमात्रा गृहीत्वा व्रजति पुनरिहायाति तैस्तैः सहैव ॥**

**अन्वयार्थ**—' प्रत्यगात्मा प्रजननसमये न आयाति अन्तकाले च न एव याति '–सर्वान्तर्यामी आत्मा उत्पत्तिकालीं येत नाहीं व मरणसमयीं जातहि नाहीं.–' यत् सः अखण्डः अस्ति '–कारण तो खण्डरहित आहे.–' इह ऊर्ध्वं अर्वाक् वा लैङ्गं मनः विशति ( तथा च ) प्रव्रजति '–ह्या व्यवहारांत, देवलोकीं किंवा मनुष्यलोकीं, पंधरा कलांनी युक्त असलेले मनच गर्भामध्ये शिरते ( व शरीर टाकून ) जाते.–' तत् वपुषः कार्श्यं स्थूलता वा न भजति '–ते मन देहाच्या कृशतेने किंवा स्थूलतेनें कृश किंवा स्थूल होत नाहीं.–' किंतु संस्कारजातैः सह तेजोमात्राः गृहीत्वा व्रजति पुनः इह तैः तैः सह एव आयाति '–पण ( ते मन मरणसमयीं ) सर्व पूर्व सस्कारासह दशेंद्रिये व प्राण यांतील सूक्ष्म तेजें खेचून घेऊन जाते व पुनः जन्मकालीं त्या त्या वासना व इन्द्रियादिकाचीं सूक्ष्म तेजे घेऊनच गर्भात येते. [ जन्म-मरणद्वारा विचार केला तरी सुद्धां जीव पृथक् नसून स्वरूपभूतच आहे; असे आता वर्णन करितात—प्राणी जन्मास येतो त्यावेळीं आत्मा कोणीकडून तरी येऊन गर्भात प्रवेश करितो व मरणसमयी तो शरीर सोडून कोठे तरी जातो, असे सर्व प्राकृत मनुष्याना वाटण्याचा सभव आहे, पण वस्तुतः तसे होत नाही. कारण ब्रह्मरूप आत्मा आकाशाहूनहि अति सूक्ष्म व अति विस्तृत आहे. सर्व भूताना आधार असणारे आकाश, सर्वाहून विस्तृत व सूक्ष्म असल्यामुळे, जर चलन-वलन करू शकत नाही तर मग त्याहूनहि अति विस्तृत व सूक्ष्म असणारे ब्रह्म कोठें जात नाही किंवा कोठून येत नाहीं, हें काय सागावें ? जाणे, येणे, स्तब्ध रहाणे इत्यादि क्रिया परिमित ( मोज-माप करितां येण्यासारख्या आकारयुक्त ) वस्तूच्या ठिकाणींच संभवतात. अखड आत्मा सर्वव्यापी असल्यामुळे कोठे जात नाहीं व येत नाहीं. ऊर्ध्वलोकीं किंवा अधोलोकीं जन्म घेताना वासना, पाच प्राण आणि दहा इंद्रिये, यांसह मन ( अन्तःकरण ) गर्भात प्रवेश करिते व तेच मरणकालीं देह सोडून जाते. ते लिंगदेहात्मक मन रोगादिकांनीं देह कृश झाला तरी कृश होत नाहीं व रसायनादि पौष्टिक औषधींच्या सेवनानें तो पुष्ट झाला तरी तें पुष्ट होत नाहीं. म्ह० कृशता, पुष्टि, दृढता इत्यादि धर्म देहाचे आहेत, मनाचे नव्हेत. देहत्याग करण्याची वेळ आली असतां मन, अनेक पूर्व जन्मांतील व प्रस्तुत जन्मांतील संचित संस्कार

—वासना आणि इंद्रियें व प्राण यांचीं तेजे ( त्यांतील ती ती शक्ति ) घेऊन निघून जातें व पुनः जन्माच्या वेळीं तेच सर्व पूर्व संस्कार व तेजोमात्रा ( इंद्रियादिकांच्या शक्ति ) यांसह गर्भात प्रवेश करितें. ] २८.

**आसीत्पूर्वं सुबन्धुर्भृशमवनिसुरो यः पुरोधाः सनाते-**
**र्ब्राह्म्यात्कूटाभिचारात्स खलु मृतिमितस्तन्मनोगात्कृतान्तम् ।**
**तद्भ्राता श्रौतमन्त्रैः पुनरनयदिति प्राह सूक्तेन वेद-**
**स्तस्मादात्माभियुक्तं व्रजति ननु मनः कर्हिचिन्नान्तरात्मा २९**

**अन्वयार्थ**—' पूर्वं अवनिसुर. सुबन्धुः भृश आसीत् '—पूर्वी सुबधुनांवाचा कोणी एक प्रसिद्ध ब्राह्मण होता,—' य सनातेः पुरोधाः—' तो सनातिराजाचा पुरोहित ( उपाध्याय ) होता.—' स खलु ब्राह्मयात् कूटाभिचारात् मृतिं इतः ' —तो ब्राह्मणानीं केलेल्या कपटास्त्रप्रयोगाने मरण पावला —' तन्मनः कृतान्तं अगात् '—त्याचे मन यमाकडे गेले. नतर—' तद्भ्राता श्रौतमन्त्रैः ( तत् ) पुनः अनयत् इति वेदः सूक्तेन प्राह '—त्या सुबंधूच्या भ्रात्याने श्रौत मत्रानी त्याच्या मनाला परत आणिले, असे वेदानें सूक्ताने सागितले आहे.—' तस्मात् आत्माभियुक्तं मनः ननु व्रजति अन्तरात्मा कर्हिचित् न ( व्रजति ) '—तस्मात् आत्मप्रतिबिंबयुक्त मन मरणकालीं जाते. अन्तरात्मा कधींहि जात नाहीं. [ आत्मा गर्भामध्ये कोठूनहि येऊन प्रवेश करीत नाहीं व मरणकाली शरीरातून कोठें निघून जात नाहीं; तर ते सर्व मन करीत असते. भगवान् आचार्यांनी याविषयीं ऋग्वेदातील एका आख्यायिकारूप श्रुतीचा येथे अनुवाद केला आहे. ऋग्वेदाच्या आठव्या अष्टकामध्यें "**यत्ते यमं वैवस्वतं मनो जगाम दूरकम्** " इत्यादि श्रुतीमध्ये अशी आख्यायिका आहे कीं, पूर्वी सनातिनावाच्या एका राजाचे, बधु, सुबधु, श्रुतबंधु आणि विप्रबंधु असे चार भाऊ उपाध्ये होते. त्यांनी राजाच्या सागण्यावरून त्याच्या शत्रूचा नाश होण्याकारितां अनेक उपाय केले; पण ते शत्रूची हत्या करणारे अभिचारक कर्म मात्र करीतना. म्हणून त्या राजाने त्यांच्यावर बहिष्कार घातला आणि दुसऱ्या दोघां कपटपटूंना पुरोहित केले. त्यामुळे बंधु इत्यादिक चारी भ्राते क्रुद्ध होऊन राजाचाच नाश करण्यास प्रवृत्त झाले. ही गोष्ट त्या मायावी पुरोहितांना समजली असतां त्यांनीं अभिचारक कर्म करून सुबंधुनांवाच्या पुरोहिताला मारिले. पण त्याच्या

चार्यांनीं "यत्ते यमं वैवस्वत०" इत्यादि पूर्वनिर्दिष्ट श्रुतिमंत्रानें त्याला पुनः जिवंत करण्याचा प्रयत्न केला. त्या मंत्राचा अर्थ असा—"हे सुबंधो, जें तुझें मन सूर्यपुत्र यमधर्माकडे दूर गेले आहे, त्या तुझ्या मनाला ह्या लोका- मध्ये रहाण्याकरिता व व्यवहार करण्याकरितां ( आम्ही ) परत फिरवितो." याप्रमाणे त्या तिन्ही बंधूंनीं मंत्रद्वारा उपाय केले असतां तो सुबंधु पुनः जिवंत झाला. ह्या श्रौत कथानकाला उद्देशून आचार्यांनीं हा श्लोक रचला आहे. वेदामध्ये अभिचारक कर्म सांगितले आहे. त्या कर्माने ब्राह्मण लोक कधी कधीं आपल्या शत्रूवर कपटास्त्रप्रयोग करीत असत. परंतु उपनिषदांनीं त्या कर्माचा, मद्यपान, कलज ( एक प्रकारचें मांस )–भक्षण, ब्रह्महत्या इत्यादिकांप्रमाणे, निषेध केला आहे. आभिचारक कर्म निषिद्ध असल्यामुळे प्रथमतः राजाच्या आज्ञेप्रमाणे सुबंधु ते करीना; पण राजाने बहिष्कृत केले असता त्याला क्रोध येऊन राजावरच अभिचार प्रयोग करण्यास ता सिद्ध झाला. पण राजाच्या नूतन पुरोहितांस ही गोष्ट समजतांच त्याच अभिचारक कर्माने त्यांनी सुबं- धूला मारिले व त्याच्या बंधूंनीं त्याचे मन यमलोकाहून परत आणिले. सारांश अंतरात्मा जन्मकालीं किंवा मृत्युसमयीं कोठेहि जात-येत नसून, गति (जाणें) व आगति ( येणे ) हीं केवळ मनालाच आहेत. ] २९.

**एको निष्कम्प आत्मा प्रचलति मनसा धावमानेन तस्मिं-**
**स्तिष्ठन्नग्रेऽथ पश्चान्न हि तमनुगतं जानते चक्षुराद्याः ।**
**यद्वत्पाथस्तरङ्गैः प्रचलति परितो धावमानैस्तदन्तः-**
**प्राक्पश्चादस्ति तेषां पवनसमुदितैस्तैः प्रशांतैर्यथावत् ॥३०॥**

**अन्वयार्थ**—'यद्वत् पाथः पवनसमुदितैः परितः धावमानैः तरंगैः प्रच- लति तेषां अन्त प्राक् पश्चात् ( च ) तत् अस्ति तैः प्रशान्तैः यथावत्'—ज्या- प्रमाणें उदक, वायूमुळें उत्पन्न होणाऱ्या व चोहोंकडे धांवणाऱ्या तरंगाच्या योगाने हालते, पण त्या तरंगांमध्यें, त्याच्या अलीकडे व पलीकडे तेंच असते आणि तरंग शांत झाले असतांहि ते पूर्वीप्रमाणे होते.—'एकः निष्कम्पः आत्मा धावमानेन मनसा (सह) प्रचलति (तथा) तस्मिन् (अपि) तिष्ठन् सन् अथ अग्रे पश्चात् च (वर्तते) तं अनुगतं चक्षुराद्याः न हि जानते'—त्याचप्रमाणे एक व चलनरहित असा हा आत्मा धांवणाऱ्या मनासहवर्तमान जातो—तसेच तो त्या मनामध्यें असून त्याच्यापुढें व मागेंहि असतो. ह्याप्रमाणे तो आत्मा मनाच्या

अगदीं बरोबर असतो तरी चक्षुरादिक वृत्ति त्याला जाणत नाहींत. [चलनादिक धर्म मनाचे आहेत, आत्म्याचे नव्हेत, असे ह्या श्लोकात सांगितले आहे. निष्क्रिय व एक असा हा आत्मा धावणाऱ्या मनासह धावत असल्यासारखा वाटतो. त्याचप्रमाणे तो मनामध्ये स्वतःच्या प्रतिबिंबरूपाने रहात असून त्याच्या मागें व पुढे किंवा उत्पत्तीच्या पूर्वी व नाशानंतरहि असतो. ह्याप्रमाणे जरी तो मनाला कधी सोडीत नाहीं, तरी चक्षुरादिक इंद्रिये त्याला जाणत नाहीत. कारण तो बाह्य व आतर अशा दोन्ही इंद्रियाहून अतीत आहे. म्हणजे इंद्रियादिकांना त्याचे ज्ञान होणे शक्य नाहीं. " यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति " ( सु. उ. स पृ० १९ ) म्हणजे नेत्राने ज्याचे दर्शन घेता येत नाहीं, परंतु नेत्रामध्ये पाहण्याची शक्ति ज्याच्यामुळे आहे; इत्यादि अनेक श्रुति याला प्रमाण आहेत. वस्तुतः तो निष्क्रिय आहे तरी मनामुळे तोच चलनादिक क्रिया करीत आहे, असे वाटते. हीच गोष्ट उदकाचा दृष्टांत देऊन स्पष्ट करितात. वायूमुळे उत्पन्न होणाऱ्या तरगांच्या योगाने उदकच सर्वत्र धांवत आहे, असे वाटते व त्या धावणाऱ्या तरगामध्ये, त्याच्या उत्पत्तीपूर्वी व नाशानंतर ( किंवा पुढे-मागे ) उदकावाचून विचारवानाला अन्य काहींच दिसत नाहीं आणि तरग शात झाले असताहि ते स्वतःच्या रूपानेच पूर्वीप्रमाणे असते. तसेच मायामय इंद्रियादिकांच्या योगाने आत्मा व्यवहार करीत असल्यासारखा वाटतो; पण तरगाप्रमाणे इंद्रियादिक शांत झाले असता तो पूर्ववत् शांतरूप होतो. ] ३०.

**एकाक्यासीत्स पूर्वं मृगयति विषयानानुपूर्व्यान्तरात्मा**
**जाया मे स्यात्प्रजा वा धनमुपकरणं कर्म कुर्वंस्तदर्थम् ।**
**क्लेशैः प्राणावशेषैर्महदपि मनुते नान्यदस्माद्गरीय-**
**स्त्वेकालाभेऽप्यकृत्स्नो मृत इव विरमत्येकहान्याऽकृतार्थः ॥**

**अन्वयार्थ**—' सः अन्तरात्मा पूर्वं एकाकी आसीत् '– हा अंतरात्मा पूर्वी एकटाच असतो.–' ( अतः परं प्रथमं ) मे जाया स्यात् प्रजा उपकरणं धनं वा ( इति ) आनुपूर्व्या विषयान् मृगयति '–नंतर प्रथम मला स्त्री असावी, मग पुत्र व्हावा व त्यानंतर संसाराचें साधन जे धन ते मिळावें अशा अनुक्रमानें विषयांना हुडकितो ( त्यांच्याविषयीं संकल्प करितो. )–' प्राणावशेषैः क्लेशैः तदर्थं कर्म कुर्वन् अन्यत् महत् अपि अस्मात् गरीयः न मनुते '–धन

मिळविण्यास्तव प्राण व्याकुळ होईतों क्लेश सहन करून कर्म करितो व दुसरी एखादी मोठी वस्तुहि ह्या विषयांहून अधिक आहे, असे मानीत नाहीं.–'एका-लाभे अपि अकृत्स्न सन् मृत इव विरमति (तथा) एकहान्या अकृतार्थः (भवति)–' ह्यांपैकीं एखादा विषय न मिळाला तरी मी अपूर्ण आहे, ( असें समजून ) मृत पुरुषासारखा स्तब्ध होऊन बसतो व एखाद्या विषयाची हानि झाली तर हा अकृतार्थ होतो. [ प्रथमतः हा अंतरात्मा एकटाच असतो. त्यावेळीं स्त्री, पुत्र इत्यादिक विषय त्याच्यापाशी नसतात. पुढे प्रथमतः माझा विवाह व्हावा, अशी तो इच्छा करितो. नंतर मला पुत्र असावेत, अशी त्याची भावना होते. तदनंतर त्या सर्वांच्या निर्वाहाचे साधन व व्यवहारात अवश्य लागणारे जे धन तें मिळावे, अशी तृष्णा उत्पन्न होते व ते धन मिळविण्याकरिता मरेमरेतो क्लेश भोगूनहि सेवा, कृषि ( शेतकी ) वाणिज्य ( व्यापार ) इत्यादि कर्मे करितो व हे धनादिविषय प्राप्त झाले असता आत्म्यासारख्या महद्वस्तूचेहि त्यापुढे त्याला महत्त्व वाटत नाही. ह्याप्रमाणे स्त्री-पुत्र-धनादि अनेक विषयापैकीं बहुतेक मिळून एखादाच न मिळाल्यास तो आपणाला अपूर्ण समजतो. ( अतृप्त होतो. ) उदाहरणार्थ एखाद्या गृहस्थास स्त्री व पुत्र असून वित्त नसले किंवा स्त्री व धन असून पुत्र नसला अथवा पुत्र व धन असून दैवयोगाने स्त्री नष्ट झाली तर तो ' हाय ! हाय ! माझा सर्वस्वी घात झाला, माझे घर बसले ' इत्यादि प्रकारानीं आक्रोश करितो. सारांश, विषयप्राप्ति होऊन त्यांपैकीं एका-चाच नाश झाला तरी हा स्वतःला अभागीच समजतो व इच्छिलेल्या अनेक विषयांपैकी एखादा न मिळाला तरी अतृप्तच असतो. ह्या श्लोकाला " आत्मै-वेदमग्र आसीत् एक एव सोऽकामयत " ( सु. उ. स. पृ० ९९९ ) इत्यादि बृह-दारण्यकश्रुति आधार आहे व त्या श्रुतीचा सर्व अर्थ वर स्पष्ट झाला आहे. ] ३१.

**नासीत्पूर्वं न पश्चादतनुदिनकराच्छादको वारिवाहो**
**दृश्यः किन्त्वन्तरासौ स्थगयति स दृशं पश्यतो नार्कबिम्बम्।**
**नो चेदेवं विनार्कं जलधरपटलं भासते तर्हि कस्मा-**
**च्चद्वद्विश्वं पिधत्ते दृशमथ न परं भासकं चालकं स्वम् ३२**

**अन्वयार्थ**—' वारिवाहः अतनुदिनकराच्छादकः ( भवति ) '–मेघ अत्यंत विस्तीर्ण सूर्याला झांकून टाकितो.–'सः पूर्वं न आसीत् पश्चात् च न ( भवति ) किंतु असौ अन्तरा दृश्यः '–तो पूर्वी नसतो व मागूनाहि नसतो. तर हा कांहीं काल मध्येच दिसतो.–'सः पश्यतः दृशं स्थगयति अर्कबिम्बं न (स्थगयति)'–

तो पाहणाऱ्याच्या दृष्टीला आच्छादित करितो; सूर्यबिंबाला आच्छादित करीत नाहीं. कारण–'एवं नो चेत् तर्हि अर्क विना जलधरपटलं कस्मात् भासते '–असें जर नसते तर मेघसमुदाय सूर्यावांचून अन्य कोणत्या प्रकाशाने दिसला असता!– ' तद्वत् विश्वं दृशं पिधत्ते '–त्याप्रमाणेच हे विश्व लोकांच्या दृष्टीला झांकतें. –'अथ पर भासक चालक स्व न '–पण सर्वश्रेष्ठ, सर्वांचा चालक, असा जो आत्मा त्याला झांकीत नाहीं. [ आचार्यांनीं ह्या श्लोकांत आवरणशक्तीचें स्पष्टीकरण केले आहे. हा सूर्य स्वर्ग, मर्त्य आणि पाताळ ह्या लोकांना प्रकाश देणारा आहे. त्याअर्थी तो मेघापेक्षां किती तरी पटीने मोठा असला पाहिजे. परतु मेघ अशा प्रचड सूर्यालाहि झांकून टाकितोसा दिसतो. तो वर्षाकाला-पूर्वी ग्रीष्म ऋतूत नसून पुढे वर्षाकालानतर शरत्कालीं सुद्धा नसतो; तर तो वर्षाऋतूमध्ये मात्र दिसत असतो. असा हा मध्येच कांहीं काल दिसणारा मेघ, सूर्याकडे पहाणाऱ्या लोकांच्या दृष्टींना आच्छादित करितो; परतु मेघापेक्षां सूर्य अतिशय विस्तृत असल्यामुळे त्याला आच्छादित करीत नाहीं. तथापि मेघाने सूर्याला झांकिले, अशी जी प्रतीति लोकांना येते, ती भ्रममूलक आहे. कारण सूर्यच जर खरोखर मेघांकडून आच्छादित झाला असता, तर मेघ दिसलेच नसते. कारण, सूर्याच्या प्रकाशावांचून नेत्रांना कोणत्याहि पदार्थाचे ज्ञान होत नाहीं. तसेच उत्पत्तीच्या पूर्वी व नाशानंतर हें जगत् नसून मध्येंच कांहीं काल व्यक्त होते व ते आत्मस्वरूपाकडे पाहणाऱ्या लोकांच्या दृष्टींना झांकून टाकिते. पण आत्मस्वरूपाला झांकीत नाहीं. म्हणजे सूर्य व त्याकडे पहाणारा पुरुष याच्यामध्ये मेघ येऊन पुरुषाची दृष्टि जशी आवृत होते, त्याप्रमाणेच ब्रह्म व प्राणी यांच्यामध्ये हे नश्वर विश्व येऊन, प्राण्यांची दृष्टि आवृत झाल्यामुळे त्यांना ब्रह्माचे ज्ञान होत नाहीं. म्हणजे त्यांना नश्वर विश्वाच्या पलीकडे दुसरी सत्स्वरूप अशी कांहीं वस्तु आहे, अशी कल्पनाच होत नाहीं. पण तेवढ्यावरून हे परब्रह्मस्वरूप नाहीं, असे कधींहि म्हणतां येणार नाहीं. कारण आपला स्वतःचा व्यवहार त्याच्याच सत्तेमुळे होतो व हे विचित्ररूप जगत्‌हि त्याच्याच सत्तेमुळें भासते. यास्तव अशा ह्या सर्वचालक परमात्म्याला हे भ्रामक जगत् परमार्थतः कधीं तरी आच्छादित करील काय ? सर्वभासक ब्रह्मच आच्छादित झाल्यास सर्व व्यवहाराचाच लोप होईल. सारांश—जगाच्या आदि, मध्य व अंत ह्या तिन्ही अवस्थांमध्ये असणारे ब्रह्मच सत्य आहे आणि त्याच्याच अज्ञानामुळें उत्पन्न होणारा हा जगाचा आकार शुक्तिरजताप्रमाणें केवळ प्रातिभासिक आहे. ] ३२.

मुञ्जानः स्वप्नराज्यं ससकलविभवो जागरं प्राप्य भूयो
राज्यभ्रष्टोऽहमित्थं न भजति विषमं तन्मृषा मन्यमानः ।
स्वप्ने कुर्वन्नगम्यागमनमुखमघं तेन न प्रत्यवायी
तद्वज्जाग्रद्दशायां व्यवहृतिमखिलां स्वप्नवद्विस्मरेच्चेत् ॥ ३३

अन्वयार्थ—' ससकलविभव.( सन् ) स्वप्नराज्य भुञ्जानः भूयो जागरं प्राप्य तन्मृषा मन्यमानः अहं राज्यभ्रष्टः इत्थं विषमं न भजति '–सर्व वैभवासहवर्तमान स्वप्नांतील राज्याचा उपभोग घेणारा पुरुष, जागा झाला असता ते स्वप्नराज्य मिथ्या आहे, असे मानितो आणि त्यामुळें ' मी आता राज्यभ्रष्ट झालो ' असे समजून खेद करीत नाहीं.–' स्वप्ने अगम्यागमनमुख अघ कुर्वन् तेन प्रत्यवायी न ( भवति ) '–तसेच स्वप्नात अगम्यागमनादि पातकें करणारा पुरुष त्या पातकानीं दोषी होत नाहीं.–' जाग्रद्दशायां ( अपि ) अखिला व्यवहृति स्वप्नवत् विस्मरेत् चेत् तर्हि तद्वत् ( प्रत्यवायी न भवति ) '–जाग्रदवस्थेतील सर्वहि व्यवहार जर प्राणी स्वप्नाप्रमाणेच विसरेल तर, तसाच दोषी होणार नाहीं. [ आता स्वप्नाच्या दृष्टांताने प्रपंच मिथ्या आहे, असें निरूपण करितात. सैन्य, भांडार, आयुधें इत्यादि सामग्रीने युक्त असलेल्या स्वप्नातील वैभवशालि राज्याचा उपभोग घेणारा पुरुष जागा झाला असता आपला पूर्वीचा तो दरिद्री देह व संसार पाहतो. पण ते स्वप्नातील राज्य खोटें आहे, असें समजत असल्यामुळे ' मी आता राज्यभ्रष्ट झालो. ' असे मानून तो कधींहि रडत बसत नाहीं. हीच गोष्ट आणखीं एका दृष्टांताने स्पष्ट करितात—स्वप्नामध्यें चांडालस्त्रीगमन, मद्यपान, ब्रह्मवध इत्यादि पातकें करणारा पुरुष जागा झाल्यावर पातकक्षालनार्थ प्रायश्चित्त घेण्यास पात्र होत नाहीं व त्याला स्वप्नांतील पातक मिथ्या आहे, असे वाटत असल्यामुळे खेदहि होत नाहीं. त्याचप्रमाणे जाग्रद्दशेत केलेला पाप-पुण्यरूप सर्व व्यवहार स्वप्नातील व्यवहाराप्रमाणेंच जर प्राणी विसरेल तर तो स्वप्नातील पाप-पुण्याप्रमाणेच ह्या जागृतींतील पाप पुण्यात्मक व्यवहारानेहि लिप्त होणार नाहीं. कारण हे स्थूल व्यवहारहि खोटे आहेत, असेच तो मानीत असतो. श्रीभगवानांनींहि 'ब्रह्मण्याधाय कर्माणि०' ( सु. गी. पृ० १०२ )–सर्व कर्में ब्रह्मसमर्पण करून व त्यांविषयी आसक्ति सोडून जो तीं करितो, तो पद्मपत्र जसें उदकानें लिप्त होत नाहीं, तसा पापानें लिप्त होत नाहीं, असें म्हटलें आहे. ] ३३.

स्वप्नावस्थानुभूतं शुभमथ विषमं तन्मृषा जागरे स्या-
ज्जाग्रत्यां स्थूलदेहव्यवहृतिविषयं तन्मृषा स्वप्नकाले ।
इत्थं मिथ्यात्वसिद्धावनिशमुभयथा सज्जते तत्र मूढः
सत्येतद्भासकेऽस्मिन्निह हि कुत इदं तन्न विद्मो वयं हि ३४

**अन्वयार्थ**—' स्वप्नावस्थानुभूत यत् शुभ अथ विषम तत् जागरे मृषा स्यात्—' स्वप्नावस्थेमध्ये अनुभविलेले शुभ किंवा अशुभ विषय जाग्रदवस्थेत खोटे ठरतात.—' जाग्रत्या यत् स्थूलदेहव्यवहृतिविषय तत् स्वप्नकाले मृषा स्यात् '—तसेच, जाग्रतीमध्ये जे स्थूल देहाच्या व्यवहारातील विषय ते स्वप्नामध्ये खोटे ठरतात.—' इत्थं उभयथा मिथ्यात्वसिद्धौ इह हि अस्मिन् एतत्भासके सति अनिश तत्र मूढ. सज्जते '—ह्याप्रमाणे दोन्ही प्रकारानीं विषय मिथ्या आहेत, असे सिद्ध असतां व त्या दोन्ही अवस्थांचा भासक अंतरात्मा येथे प्रत्यक्षसिद्ध असताहि मूढ पुरुष सतत विषयाच्या ठिकाणी आ-सक्त होतो.—' तदिद कुतः इति वय न विद्म. हि '—पण हे असे का होते, हे आम्हाला कळत नाहीच. [ आचार्य आता ह्या चवतिसाव्या श्लोकामध्ये जाग्रत् व स्वप्न ह्या दोन्ही अवस्था भ्रममूलक आहेत, असे प्रतिपादन करितात. स्वा-प्निक राज्यप्राप्ति इत्यादि इष्ट भोग व व्याघ्राने भक्षण करणे, सर्पदंश होणे इत्यादि अनिष्ट भोग त्या अवस्थेमध्ये जरी सुख-दुःख देत असले तरी जाग्रतींत ते खोटे आहेत, असा मनाचा निश्चय होतो. तसेच जागृतींत स्थूलदेहद्वारा प्राप्त होणारे मिष्टान्नभोजन, स्त्री पुत्र-धनादिप्राप्ति इत्यादि इष्ट व शरीरपीडा, मानसिक व्यथा इत्यादि अनिष्ट भोग स्वप्नावस्थेत खोटे ठरतात. याप्रमाणे ह्या अवस्था खोट्या आहेत, असे सिद्ध झाले असतां व त्या दोन्ही अवस्थांचा प्रका-शक—ज्ञान किंवा स्मरण देणारा आत्मा-प्रत्यक्ष प्रत्ययाला येत असता मूर्ख पुरुष विषयांमध्ये का आसक्त होतात, हे आम्हाला मुळींच समजत नाहीं. ] ३४.

जीवन्तं जाग्रतीह स्वजनमथ मृतं स्वप्नकाले निरीक्ष्य
निर्वेदं यात्यकस्मान्मृतममृतममुं वीक्ष्य हर्षं प्रयाति ।
स्मृत्वाप्येतस्य जन्तोर्निधनमसुयुतिं भाषते तेन साकं
सत्येवं भाति भूयोल्पकसमयवशात्सत्यता वा मृषात्वम् ॥

**अन्वयार्थ**—' इह जाग्रति जीवन्तं स्वजनं अथ स्वप्नकाले मृतं निरीक्ष्य अकस्मात् निर्वेद याति '—ह्या जाग्रदवस्थेंत आपल्या एखाद्या जिवंत असलेल्या आप्ताला स्वप्नांत मृत पाहून एकाएकीं मनुष्य शोक करूं लागतो—' अथवा ( जाग्रत्यां ) मृत अमु ( स्वप्नकाले ) अमृतं वीक्ष्य हर्ष प्रयाति—' किंवा तसेंच जाग्रत्कालीं मेलेल्या आप्ताला स्वप्नांत जिवंत पाहून तो हर्ष मानितो.—' एतस्य जन्तोः निधन स्मृत्वा अपि ( अथवा जीवतः ) असुयुति स्मृत्वा अपि तेन साकं भाषते ( तथा मृतेन दीनालाप करोति ) '—ह्या प्राण्याच्या ( स्वप्नांतील ) मरणाचे ह्याला जाग्रतींत स्मरण असूनहि, त्याच्याशीं बोलतो; तसेच जाग्रतींत मृत झालेल्याला स्वप्नांत जिवत पाहिल्याचे स्मरण असूनहि त्याच्याविषयीं दीनालाप ( खेद ) करितो.—' एव सति भूयोऽल्पकसमयवशात् सत्यता मृषात्वं वा भाति '—असे असताहि दीर्घकाल भासणे व थोडा वेळ भासणे यांमुळेच एक अवस्था सत्य व दुसरी खोटी, असे भासते. [ मागच्या श्लोकात निर्दिष्ट केलेलीच गोष्ट आणखी एक दृष्टान्त देऊन स्पष्ट करितात—व्यवहारामध्ये एखादा पुरुष आपल्या जिवत आप्ताला स्वप्नामध्ये मृत पहातो आणि त्या स्वप्नावस्थेमध्येच त्या आप्ताविषयीं आक्रोश करितो. तसेच खरोखर मृत झालेल्या मनुष्याला स्वप्नात जिवंत पाहून मोठा आनद मानितो. पहिल्या दोन चरणात जाग्रदवस्थेतील विषय स्वप्नांत मिथ्या कसे ठरतात ,ते दाखविले आहे. पण यावर कदाचित् कोणी त्या मरणाचे अथवा जिवतपणाचे स्मरण नसल्यामुळे असे भ्रामक ज्ञान होते, असे म्हणतील, म्हणून "स्मृत्वा०" इत्यादि पुढील चरणांत सांगतात—जागा झाल्यावर ज्या मनुष्याला स्वप्नामध्ये मृत पाहिले होते त्याच्याशी, त्याच्या मरणाचे स्मरण असूनहि, भाषणादि सर्व व्यवहार करितो. म्हणजे त्याला स्वप्नांतील गोष्टी खोट्या आहेत, असे निश्चयानें माहीत असतें. तसेच खरोखरच मृत झालेल्या मनुष्याला हा स्वप्नांत जिवत पहातो व जागा झाल्यावर त्याला त्या स्वप्नाची आठवण असली तरी पूर्वीप्रमाणेच त्या मृताविषयीं रडत बसतो. ह्याप्रमाणे दोन्ही प्रकारानीं स्वप्न व जागृति मिथ्या आहेत, असा अनुभव येत असूनहि स्वप्नातील विषयांची अगदीं थोडा वेळ प्रतीति येत असल्यामुळे ते मिथ्या व जाग्रदवस्थेतील विषयांचा बराच वेळपर्यंत अनुभव येतो म्हणून ते सत्य, असे लोक मानितात. कारण एका स्वप्नांत जी वस्तु आपण पाहिली तीच दुसऱ्या स्वप्नांतहि पहावयास सांपडेल, किंवा तिचें निदान स्मरण तरी होईल, असा नियम नाहीं. पण जाग्रदवस्थेमध्यें आपण एकदा ज्याचा अनुभव घेतला त्याच विषयाचा पुनः कांहीं काल अनु-

भव घेतां येतो. किंवा निदान प्रस्तुत देह आणि आत्मा यांचा संबंध असेपर्यंत त्याचें स्मरण तरी असतें. म्हणून स्वप्नाला मिथ्या व जागृतीला सत्य असें आम्ही भ्रमाने म्हणतो. परतु सूक्ष्म दृष्टीने विचार करूं लागलें असतां त्या दोन्ही अवस्था मिथ्याच आहेत, असें प्रत्ययाला येतें. ] ३९.

**स्वाप्नस्त्रीसङ्गसौख्यादपि भृशमसतो या च रेतश्च्युतिः स्यात्**
**सादृश्याच्चद्वदेतत्स्फुरति जगदसत्कारणं सत्यकल्पम् ।**
**स्वप्ने सत्यः पुमान्स्याद्युवतिरिह मृषैवानयोः संयुतिश्च**
**प्रातः शुक्रेण वस्त्रोपहतिरिति यतः कल्पनामूलमेतत् ॥३६**

अन्वयार्थ—' भृश च असत अपि स्वाप्नस्त्रीसगसौख्यात् या रेतश्च्युतिः स्यात् '—अगदीं खोट्या अशा स्वप्नातील स्त्रीसगसौख्यापासूनसुद्धा जे रेतस्खलन होतें.—' तद्वत् असत्कारण एतत् जगत् सादृश्यात् सत्यकल्प स्फुरति '—त्याचप्रमाणे ज्याचे कारण खोटें आहे, असे हे जगत् वरील दृष्टांताप्रमाणेच असल्यामुळे खरें असल्यासारखे भासते.—' स्वप्ने पुमान् सत्यः स्यात् इह युवतिः अनयोः सयुतिः च मृषा एव '—स्वप्नामध्ये पुरुष ( भोक्ता ) मात्र खरा असतो, स्त्री व त्या स्त्रीपुरुषाचा सग हीं दोन्हीं खोटींच असतात; ( परंतु )—' प्रातः शुक्रेण वस्त्रोपहतिः ( प्रत्यक्षसिद्धा ) इति यत. ( तस्मात् )—एतत् कल्पनामूलम् '— परतु प्रातःकाळीं शुक्राच्या योगाने वस्त्र मलिन झालेले आपण प्रत्यक्ष पाहतो. ज्याअर्थी असे आहे त्याअर्थी हे सर्व कल्पनामूल आहे. [ आतां ह्या श्लोकांत, विश्वाचे उपादान कारण जरी असत् आहे तरी ते व्यावहारिक सत्य कसे, हे दृष्टान्ताने स्पष्ट करितात. स्वप्नातील स्त्रीसग खोटा असतो. परंतु त्याचा परिणाम मात्र सत्यत्वानें अनुभवाला येतो. त्याचप्रमाणे हें जगत् व्यावहारिक सत्य असल्यामुळें त्याचें कारण जरी असत् आहे तरी ते सत्य असल्यासारखे भासतें. येथे असत् म्हणजे सदसद्विलक्षण अविद्या आणि सत् म्हणजे अनुभवाला योग्य अशी सर्व व्यक्त सृष्टि, असा अर्थ करावा. जगत् सत्य असल्यासारखे भासते, असे म्हटले आहे; केवळ ' सत्य आहे ' असे म्हटले नाहीं. कारण सुषुप्ति—( निद्रा- ) अवस्थेमध्यें त्याचा अस्त होत असतो; म्हणून ते परमार्थ सत्य नव्हे, तर तें व्यावहारिक सत्य आहे. पुढील श्लोकार्धात दृष्टान्ताप्रमाणेंच दार्ष्टांतिक ( जगत् ) आहे, असें सिद्ध केलें आहे. स्वप्नामध्यें पुरुष सत्य असून स्त्री व संभोग हीं खोटीं असतात व प्रातःकाळीं

जागृत झाल्यावर त्याला गुंडाळलेलें वस्त्र प्रत्यक्ष दिसतें. तसेंच आत्मा सत्य असून त्रीस्थानीय माया असत्य आहे व त्या दोघांचा संबंध आरोपित असल्यामुळे खोटा आहे आणि त्यापासून उत्पन्न होणारे जगत् व्यावहारिक सत्य आहे. सारांश हे सर्वहि काल्पनिक आहे. यांत पारमार्थिक सत्यत्वाचा यत्किंचितहि गंधहि नाहीं. ] ३६.

पश्यन्त्यारामम‌स्य प्रतिदिवसममी जन्तवः स्वापकाले
पश्यत्येनं न कश्चित्करणगणमृते मायया क्रीडमानम् ।
जाग्रत्यर्थव्रजानामथ च तनुभृतां भासकं चालकं वा
नो जानीते सुषुप्तौ परमसुखमयं कश्चिदाश्चर्यमेतत् ॥ ३७॥

**अन्वयार्थ**—'अमी जन्तवः प्रतिदिवसं स्वापकाले अस्य आरामं पश्यन्ति'—हे सर्व प्राणी प्रत्येक दिवशीं निद्रित झाले असतां ह्या आत्म्याची क्रीडा—(स्वप्नावस्थेंतील व्यवहार) पहातात; (परंतु)—करणगणं ऋते मायया क्रीडमानं एनं न कश्चित् पश्यति'—परंतु बाह्येंद्रियांचें साहाय्य घेतल्याशिवाय स्वप्नांतील देहेंद्रियरूपी मायेच्या योगानें व्यवहार करणाऱ्या ह्या आत्म्याला कोणीहि पहात नाहींत.—'अथ जाग्रति अर्थव्रजानां भासकं तनुभृतां च चालकं वा (न पश्यति)'—तसेंच जागृतींतहि सर्व विषयसमूहाचा भासक व सर्व प्राण्यांचा चालक, अशा आत्म्याला कोणीहि पहात नाहीं,—'(तथा) सुषुप्तौ परमसुखमयं कश्चित् नो जानीते एतत् आश्चर्यम्'—(आणि पुनः तसेंच) सुषुप्तिमध्यें (म्हणजे स्वप्नरहित निद्रावस्थेमध्यें) अत्यंत सुखमय अशा आत्म्यालाहि कोणी पहात नाहीं, हे केवढे हो आश्चर्य आहे ! ! [ आतां श्रीमत् आचार्य तिन्ही अवस्थांमध्यें आत्म्याचा प्रत्येकाला अनुभव येत असूनहि, त्याचें कधीं कोणी विवेचन करीत नाहीं, ह्याविषयीं आश्चर्य प्रदर्शित करितात. तिन्ही अवस्थांत आत्म्याचा, स्थूल व सूक्ष्म व्यवहारानें व अखंड आनंदवृत्तीनें सर्वांना अनुभव येत असूनहि त्याला कोणी जाणांत नाहींत. इतकेंच नव्हे तर, त्याच्याविषयीं विचार करण्यासहि कोणी तयार होत नाहींत. फार काय पण कित्येक ह्या लौकिक संपत्तीनें व विद्वत्तेनें मोहित होऊन सर्वांचा नियामक असा हा परमात्मा आहे किंवा नाहीं, ह्या विषयींच साशंक असतात; हें केवढें अज्ञान आहे ! ] ३७.

**स्वप्ने मन्त्रोपदेशः श्रवणपरिचितः सत्य एष प्रबोधे**
**स्वप्नादेव प्रसादादभिलषितफलं सत्यतां प्रातरेति ।**
**सत्यप्राप्तिस्त्वसत्यादपि भवति तथा किं च तत्स्वप्रकाशं**
**येनेदं भाति सर्वं चरमचरमथोच्चावचं दृश्यजातम् ॥३८॥**

**अन्वयार्थ**—' स्वप्ने मन्त्रोपदेशः श्रवणपरिचितः सन् एषः प्रबोधे सत्यः ( भवति ) '—स्वप्नांतील ( गुरूंचा ) मंत्रोपदेश कर्णगोचर झाल्याने जागृत झाल्यावर प्रातःकाळीं तो सत्य होतो. ( जशाचा तसा आठवतो )—' तथा स्वप्नात् प्रसादात् एव अभिलषितफल ( प्राप्त ) प्रातः सत्यता एति '—तसेच स्वप्नांत ( ईश्वर- ) प्रसादाने प्राप्त झालेलें इष्ट फळ सकाळीं खरें ठरतें.—' तथा ( च ) सत्यप्राप्ति तु असत्यात् अपि भवति '—याअर्थी सत्याची प्राप्ति असत्यापासूनसुद्धां होते. '—किंच येन इदं सर्वं चर अचर अथ उच्चावच दृश्यजातं भाति तत् स्वप्रकाश ( अस्ति ) '—शिवाय ज्याच्या योगाने हे सर्वहि स्थावर-जंगमात्मक व उच्च-नीच दृश्यजात भासते ( प्रतीतीला येते ) तें आत्मस्वरूप स्वप्रकाश आहे. [ जाग्रदवस्था मिथ्या आहे, असे स्वप्नदृष्टान्ताने सांगितले असतां त्या अवस्थेमध्ये गुरूपदेशाने व उपनिषदांच्या विचाराने होणारा ब्रह्मबोध व ज्या ब्रह्माचा अशा मिथ्या जाग्रदवस्थेत बोध होणार तें ब्रह्म हीं दोन्ही वंध्यापुत्राप्रमाणे मिथ्याच असलीं पाहिजेत, अशी शंका कोणी घेतील म्हणून आचार्य म्हणतात—गुरु प्रिय शिष्याच्या स्वप्नांत येऊन त्याला मंत्राचा उपदेश करितात. तो मंत्र त्याच्या सूक्ष्म श्रवणेंद्रियाशीं परिचित झाल्याने प्रातःकाली जशाचा तसा आठवतो. म्हणजे तो मंत्रोपदेश सत्य ठरतो. तसेच, एखादा पुरुष ईश्वराच्या अनुग्रहानें स्वप्नांत इष्ट फल मिळालेले पहातो व तीच गोष्ट सकाळीं खरी ठरते ( प्रत्ययाला येते ). स्वप्नांत एखाद्याला मित्रादिकांचें पत्र आल्याचें दिसते, किंवा कोणी रोगग्रस्त आप्त बरा होण्याचे शुभसूचक स्वप्न पहातो व तसाच त्याला जागेपणीं पुढें अनुभवहि येतो. सारांश—ज्याअर्थी असत्यापासून सुद्धां सत्याची प्राप्ति होते, ही गोष्ट सिद्ध झाली, त्याअर्थी मिथ्या जाग्रदवस्थेमध्ये होणारा ब्रह्मबोध सत्य अशा तुरीयावस्थेंत सत्य ठरण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. शिवाय ह्या सर्व दृश्य पदार्थांना प्रकाशित करणारा परमात्मा स्वप्रकाश आहे. म्हणजे एका दिव्याला पहाण्याकरितां जशी दुसऱ्या दिव्याची आवश्यकता नसते तशीच याच्या ज्ञानाला दुसऱ्या कशाचीहि अपेक्षा नाहीं. ] ३८.

मध्यप्राणं सुषुप्तौ स्वजनिमनुविशन्त्यग्निसूर्योदयोऽमी
वागाद्याः प्राणवायुं तदिह निगदिता ग्लानिरेषां न वायोः ।
तेभ्यो दृश्यावभासो भ्रम इति विदितः शुक्तिकारौप्यकल्पः
प्राणायामव्रतं तच्छ्रुतिशिरसि मतं स्वात्मलब्धौ न चान्यत् ३९

**अन्वयार्थ**—' सुषुप्तौ अमी अग्निसूर्यादयः स्वजनिं मध्यप्राण अनुविशन्ति '—सुषुप्तीमध्ये ह्या अग्नि-सूर्यादिक देवता स्वकारणभूत मुख्य प्राणामध्ये प्रविष्ट होतात.—' ( तथा ) वागाद्याः प्राणवायु ( अनुविशन्ति ) '—तसेच, वागादि इंद्रियें प्राणवायूत प्रविष्ट होतात.—' तत् एषा इह ग्लानिः निगदिता '—म्हणून त्यांचा सुषुप्त्यवस्थेमध्ये लय होतो, असे सांगितले आहे.—' ( किंतु ) वायोः न ( ग्लानिः )'—( परंतु ) प्राणवायूचा कधींच लय होत नाहीं. —'शुक्तिकारौप्यकल्प' तेभ्यः ( यः ) दृश्यावभासः ( सः ) भ्रम' इति विदितः '—( अर्थात् ) शिंपीच्या ठिकाणीं जसा रुप्याचा भास होतो, तसा इंद्रियांच्या योगानें जो हा जगाचा भास होत असतो, तो भ्रम आहे, असे समजत.—'तत् स्वात्मलब्धौ प्राणायामव्रत श्रुतिशिरसि मत न च अन्यत् '—म्हणून आत्मप्राप्ति होण्याकरिता प्राणायामव्रतच वेदान्तसमत आहे, अन्य काही नाहीं [ ह्याप्रमाणे मागच्या श्लोकांत स्वप्नाच्या दृष्टान्तानें जगत् मिथ्या आहे, असे प्रतिपादन करून ह्या श्लोकांत ' ते सत्य आहे ' असे भासणाऱ्या जाग्रत्-अवस्थेतहि ते मिथ्याच आहे, असे निरूपण करितात. ' वाणीची देवता अग्नि, प्राणाची देवता वायु, नेत्रांची देवता सूर्य, श्रवणांची देवता दिशा व त्वगिंद्रियाची देवता ओषधि-वनस्पति होय ' असे उपनिषदांतून अनेक ठिकाणीं वर्णन आहे. सुषुप्तीमध्ये ह्या सर्व इंद्रियदेवता मुख्य प्राणात ( विराट्संज्ञक जीवतत्त्वांत ) प्रविष्ट होतात. कारण तो मुख्य प्राणच त्यांचे उत्पत्तिस्थान आहे. तसेच वाक्, चक्षु इत्यादि इंद्रियें इंद्रनांवाच्या प्राणवायूत प्रविष्ट होतात. म्हणूनच देवतांसह इंद्रियांचा सुषुप्तींत लय होतो, असें उपनिषदांत सांगितले आहे. पण ह्या स्थूलसूक्ष्मप्रपंचाचा जींत लय होत असतो, अशा सुषुप्तींत प्राणवायूचा कधींच अस्त होत नाहीं. कारण श्वासरूपानें तो त्या अवस्थेतहि प्रत्यक्ष दिसत असतो व यावरून जागृतींत आपल्या इंद्रियांच्या द्वारा जी रूप-रसादि विषयांची प्रतीति येत असल्यासारखी वाटते ती खरी नव्हे; तर तो शुक्तिरौप्यप्रतीतीप्रमाणेंच भ्रम आहे, असें समजतें. यास्तव तिन्ही अवस्थांमध्ये लय न पावणाऱ्या प्राणाचें नियमन

करणें हाच आत्मज्ञानाचा उत्तम उपाय आहे, असें वेदान्तांत सांगितलें आहे; पण चक्षुरादि इंद्रियव्रताचा कोठेहि उपदेश केलेला नाहीं. कारण तीं इंद्रियें कोणत्याच अवस्थेत आत्मसाक्षात्कार करून द्यावयास समर्थ होत नाहींत. ] ३९

**नोऽकस्मादार्द्रमेघः स्पृशति च दहनः किन्तु शुष्कं निदाघा-**
**दार्द्रं चेतोऽनुबन्धैः कृतसुकृतमपि स्वोक्तकर्मप्रजार्थैः ।**
**तद्वज्ज्ञानाग्निरेतत्स्पृशति न महसा किन्तु वैराग्यशुष्कं**
**तस्माच्छुद्धो विरागः प्रथममभिहितस्तेन विज्ञानसिद्धिः ॥४०**

**अन्वयार्थ**—' दहनः आर्द्रं एध अकस्मात् नो स्पृशति च किन्तु निदाघात् शुष्कं ( स्पृशति ) '–अग्नि ओल्या काष्ठाला एकाएकीं स्पर्श करीत नाहीं; परतु उष्णतेने वाळून शुष्क झालेल्या काष्ठाला स्पर्श करितो ( जाळतो ). —' तद्वत् अनुबन्धै एतत् आर्द्रं चेत स्वोक्तकर्मप्रजार्थैः कृतसुकृत अपि ज्ञानाग्निः सहसा न स्पृशति '–तसेच भार्यापुत्रादि उपाधींनीं आर्द्र झालेल्या ह्या अंतः-करणाला, विहित कर्म, प्रजा व वित्त यांच्या द्वारा त्या अतःकरणाने सुकृत केले असले तरी, ज्ञानाग्नि सहसा स्पर्श करीत नाही.—' किन्तु वैराग्यशुष्कं ( स्पृशति ) '–तर वैराग्याने शुष्क झालेल्या अतःकरणाला तो स्पर्श करितो —' तस्मात् प्रथम शुद्धः विराग. अभिहित: '–म्हणून प्रथमतः शुद्ध विरक्ति सांगितली आहे–'( ततः ) तेन विज्ञानसिद्धिः ( भवति ) '–आणि मग तिच्या-योगाने विज्ञानसिद्धि होते. [ आचार्यांनी वैराग्याच्या योगानेच ज्ञानप्राप्ति होते, असे ह्या श्लोकात दर्शविले आहे. ओल्या काष्ठाला अग्नि एकदम जाळीत नाहीं. पण वाळलेल्या इंधनाला तत्क्षणीच जाळून टाकतो, हे जगत्प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणे भार्यादि विषयाच्या योगाने दूषित झालेल्या अतःकरणांत ज्ञानोदय होत नाही. आपल्या वर्णाला व आश्रमाला उचित अशीं संध्या-वंदनादि कर्में, धर्मपत्नीपासून पुत्रोत्पत्ति व द्रव्यसाध्य यज्ञ दानादि यांच्या योगाने, एखाद्या पुरुषाने पुष्कळ पुण्य जरी सपादन केले असले तरी त्याचें अंतःकरण विषयासक्त असल्यामुळें त्यातहि ज्ञानाचा प्रकाश पडत नाहीं. परंतु विषयवैराग्याने ज्या धन्य पुरुषाचे अतःकरण रुक्ष होऊन गेलेले असतें त्यालाच ज्ञानप्राप्ति होते. म्हणून प्रथमतः साधकानें अवश्य शुद्ध वैराग्यसपन्न ( वांति होऊन पडलेल्या अन्नाप्रमाणे विषयांविषयीं निस्तृष्ण ) व्हावें, असें वेदान्तांत

अनेक स्थळीं सांगितलें आहे व असें उत्तम वैराग्य प्राप्त झालें असतां मग अनायासें ज्ञानसिद्धि होते. ह्याविषयीं ' न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेन० ' ( सा. ना. पृ० ३९ ) म्ह० कर्माने, प्रजेनें, किंवा वित्तानें मोक्षप्राप्ति होत नसून केवळ विरक्तीनेंच त्याची प्राप्ति होते, अशा अर्थाची श्रुति प्रमाण आहे.] ४०.

**यत्किंचिन्नामरूपात्मकमिदमसदेवोदितं भाति भूमौ**
**येनानेकप्रकारैर्व्यवहरति जगद्येन तेनेश्वरेण ।**
**तद्वत्प्रच्छादनीयं निभृतरशनया यद्वदेव द्विजिह्वः**
**तेन त्यक्तेन भोज्यं सुखमनतिशयं मा गृधोऽन्यद्धनाद्यम् ॥**

**अन्वयार्थ**—' यत् किंचित् असत् एव उदित इदं नामरूपात्मकं ( जगत् ) भूमौ येन भाति '—जें हे कांहीं मिथ्याच उत्पन्न झालेले नामरूपात्मक जगत् या व्यवहरात ज्याच्यामुळे भासते,—' येन जगत् अनेकप्रकारैः व्यवहरति '—ज्याच्यायोगाने प्राणी अनेकप्रकारे व्यवहार करितात,—'तेन ईश्वरेण यद्वदेव निभृतरशनया द्विजिह्वः तद्वत् प्रच्छादनीयं '—त्या ईश्वराने रज्जु जशी सर्पाला झांकून टाकिते, तसे ( हे ) झाकून टाकावें. ( सारांश ह्याप्रमाणे )—'तेन त्यक्तेन (च) अनतिशय सुखं भोज्यं '—जगदाभासाचा त्याग करून अत्युत्तम सुखाचा उपभोग घ्यावा व—' अन्यत् धनाद्य मा गृधः '—धनादि अन्य विषयांची इच्छा करूं नये. [ पूर्व श्लोकात प्रथमतः वैराग्यसंपत्ति व नंतर त्यापासून ज्ञान असा क्रम सांगितला आहे. आतां त्या उपदेशक्रमाला आधार असणाऱ्या ' ईशावास्यमिदꣳसर्वं....मा गृधः कस्यस्विद्धनं ' ( सु. उ. स. पृ० १ ) इत्यादि ईशावास्य श्रुतीचा येथे अनुवाद करितात—शिंपीच्या ठिकाणीं भ्रमाने जसा रुप्याचा उदय होतो, तसेच हें केवळ स्वाज्ञानानें नाम-रूपानीं व्यक्त झालेले जगत् ज्याच्यामुळे प्रतीतीला येते व ज्याच्यामुळे यांतील सर्व जन व्यवहार करितात, त्या ईश्वराच्या योगानें हे साधकाने झांकावें. म्ह० व्यवहारांत दोरीचे ज्ञान न झाल्यानें हा सर्प आहे, अशी आपणाला प्रतीति येते; पण दोरीचे यथार्थ ज्ञान झालें असतां जसा तो सर्प दोरींत विलीन होतो ( दोरीनें त्याला झाकल्यासारखे आपणाला वाटते ) तसेंच हे भ्रामक जगत् ब्रह्मानें झांकून टाकावें. हें सर्व जगत् सर्वप्रवर्तक जे ब्रह्म, तद्रूप आहे, असे पहावें आणि अशा भावनेनें सर्व जगदाभास सर्वथैव नष्ट झाला असतां, सर्वोत्कृष्ट सुखाचा यथेच्छ अनुभव घ्यावा. पण धनादि अन्य विषयांची पुनः कधींहि इच्छा करूं नये. कारण

त्यांच्यायोगानें साधक स्वरूपज्ञानापासून भ्रष्ट होतो. सारांश १ ईश्वरमय सर्व जगत् पहावें; २ त्यामुळें अत्यंत सुख भोगावें व ३ विषयांची इच्छा करूं नये, असे तीन उपदेश या श्लोकांत केले आहेत. ] ४१.

**जीवन्मुक्तिर्मुमुक्षोः प्रथममथ ततो मुक्तिरात्यन्तिकी च**
**तेऽभ्यासज्ञानयोगाद्गुरुचरणकृपापांगसंगेन लब्धात् ।**
**अभ्यासोऽपि द्विधा स्यादधिकरणवशाद्दैहिको मानसश्च**
**शारीरस्त्वासनाद्यो ह्युपरतिरपरो ज्ञानयोगः परोक्तः ॥ ४२**

**अन्वयार्थ**—'अथ मुमुक्षोः प्रथमं जीवन्मुक्तिः ततः आत्यान्तिकी च मुक्तिः'—प्रथमत मुमुक्षूला जीवन्मुक्ति आणि नतर निरतिशय मुक्ति प्राप्त होते;—'ते गुरुचरणकृपापाङ्गसगेन लब्धात् अभ्यासज्ञानयोगात् ( भवतः ) '—व त्या दोन मुक्ति, गुरुचरणकृपाकटाक्षाच्या योगाने साध्य झालेल्या अभ्यासाने व ज्ञानयोगाने प्राप्त होतात.—' अभ्यास अपि अधिकरणवशात् दैहिक. मानसः च इति द्विधा स्यात् '—आधाराच्या योगानें दैहिक व मानासिक असा दोन प्रकारचा अभ्यास आहे—' आसनाद्यः शारीर. अपर हि उपरतिः ( मानस ) '—यम, नियम, आसन, इत्यादि शरीराचा व शाति, प्रपंचोपशम वगैरे हा मनाचा अभ्यास होय.—' ज्ञानयोगः परोक्तः हि '—ज्ञानयोग हा सर्वापेक्षां श्रेष्ठच सागितला आहे. [ आता दोन प्रकारचा मोक्षोपाय सांगतात—मुमुक्षु पुरुषाला प्रथमतः जीवन्मुक्ति प्राप्त होते. जिवत असता मुक्ताप्रमाणे नि.संग असणें हाच जीवन्मोक्ष होय. भगवद्गीतेमध्ये दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं भगवंतानीं अशा जीवन्मुक्त पुरुषाला स्थितप्रज्ञ असे म्हटलें आहे. प्राक्तन भोग संपल्यावर देहाचा त्याग करून, शुद्धोदक शुद्धोदकात टाकिले असतां जसें तें तद्रूप होऊन जाते त्याप्रमाणें, तो मुमुक्षु ब्रह्मरूप होऊन जातो. ह्यालाच निरतिशय मुक्ति असे म्हणतात व ह्या दोन्हीहि मुक्ति, पूज्य गुरूंच्या कृपाकटाक्षानें प्राप्त झालेला अभ्यास ( म्ह० एकच क्रिया पुन पुन. करणे ) व ज्ञानयोग, या दोन उपायांनीं प्राप्त होतात. तो अभ्यास देहाच्या आश्रयाने व मनाच्या आश्रयानें होत असतो. यम, नियम, आसन, प्राणायाम व प्रत्याहार हा देहाच्या योगानें होणारा अभ्यास आणि मनाच्या सर्वहि वृत्ति शांत झाल्यामुळे जो सर्व प्रपंचाचा उपशम होत असतो, तो दुसरा मानसिक अभ्यास होय. वस्तुतः आसनादिसिद्धि व प्रपंचाचा उपशम हा अभ्यास नसून, हीं दोन्ही अभ्या-

त्याचीं फलें आहेत व आसनादि सिद्धि होण्याकरितां योगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें पुन: पुन: प्रयत्न करणें हाच खरा अभ्यास होय. ज्ञानयोग या द्विविध अभ्यासाहून श्रेष्ठ आहे, असे सांगितलें आहे व तो या अभ्यासाच्या योगानें प्राप्त होतो. ] ४२.

**सर्वानुन्मूल्य कामान् हृदि कृतनिलयान्क्षिप्तशंकूनिवोच्चै-**
**र्जीर्यद्देहाभिमानस्त्यजति चपलतामात्मदत्तावधानः ।**
**यात्यूर्ध्वस्थानमुच्चैः कृतसुकृतभरो नाडिकाभिर्विचित्रं .**
**नीलश्वेतारुणाभिः स्रवदमृतभरं गृह्यमाणात्मसौख्यः ॥ ४३**

**अन्वयार्थ**—' उच्चैः क्षिप्तशंकुन् इव हृदि कृतनिलयान् सर्वान् कामान् उन्मूल्य जीर्यद्देहाभिमानः आत्मदत्तावधानः ( च ) सन् चपलता त्यजति '—जोराने ठोकलेल्या खिळयाप्रमाणे हृदयामध्ये घर करून राहिलेल्या सर्वहि इच्छांना काढून टाकून ज्यानें देहाभिमान सोडला आहे व ज्याने आत्मानुसंधान ठेविले आहे, असा पुरुष मनाची चपलता टाकितो—' (तथाभूतः सन् ) कृतसुकृतभरः गृह्यमाणात्मसौख्यः नीलश्वेतारुणाभिः नाडिकाभिः विचित्रं स्रवदमृतभरं उच्चैः ऊर्ध्वस्थान याति '—व याप्रमाणे वृत्तिरहित होऊन ज्यानें पुष्कळ पुण्य केले आहे व जो आत्मसौख्याचा अनुभव घेत आहे, असा जीवन्मुक्त, नील, श्वेत व अरुणा अशा नाड्यांनीं विचित्र व ज्याच्यापासून अमृतस्राव होत असतो अशा सर्वोत्कृष्ट ब्रह्मस्थानाला जातो. [ पूर्व श्लोकात सांगितलेल्या दोन मुक्तींपैकीं जीवन्मुक्ति कोणती हे सांगतात—ज्याप्रमाणे तीक्ष्ण अग्राचा खिळा जोराने भूमीमध्ये ठोकला असतां तो पुष्कळ खोल जाऊन तेथे घर करून बसतो, त्याप्रमाणे अनेक कल्पपर्यंत संस्काररूपाने ( बीजरूपाने ) हृदयामध्ये दृढ होऊन राहिलेल्या सर्व मनोरथांना समूळ काढून टाकून जो मुमुक्षु देहाविषयीं निरभिमान झाला आहे व जो आत्म्याच्या ठिकाणीं अंत:करणाचे अवधान ठेवून राहतो, त्याच्या मनाची विक्षिप्तावस्था ( चांचल्य) सर्वथैव नष्ट होते. मनाची चंचलता गेली असता प्राण्याच्या हातून राजस व तामस कृत्ये होत नाहींत. त्यामुळें त्याचा पुष्कळ पुण्यसंचय होतो. पण देहसंबंधामुळे किंचित् अभिमान राहिल्याने ' मी आत्मानुभवी आहें ' असे त्याला वाटत असतें. सारांश, आत्मानुभवी जीवन्मुक्त पुरुष निळ्या, पांढऱ्या व आरक्त नाड्यांनीं विचित्र व कुंडलिनीचा भेद झाल्यामुळें ज्याच्यापासून अमृ-

त्याचा स्राव होत असतो अशा सर्वश्रेष्ठ ब्रह्मरंध्राला सुषुम्नानाडीच्या द्वारा जातो. या प्रतिपादनाला " यदा सर्वे प्रमुच्यन्ते० " ( सु. उ. सं. पृ० ६९२ ) इत्यादि बृहदारण्यकांतील चार कंडिका आधार आहेत. त्यांचें तात्पर्य—ह्या मुमुक्षु पुरुषाच्या अतःकरणांतील सर्व वासना नष्ट झाल्या असतां तत्क्षणींच तो ( मरणधर्मवान् ) अमृत ( मरणधर्मरहित ) होतो व त्याला या देहांतच ब्रह्मानुभव येतो १. याज्ञवल्क्य जनकाला म्हणाले—" हे राजा, जशी सर्पाची जीर्ण त्वचा ( कात ) सर्पाच्या बिळांत सर्पाप्रमाणेच पडलेली असते व ती निश्चेष्ट असली तरी दुरून पाहणाराला सर्पासारखीच भासते; पण सर्पाच्या दंशादि क्रिया मात्र करीत नाहीं; तसाच हा जीवन्मुक्त पुरुष शरीरांत राहू-नहि कांहीं क्रिया करीत नाहीं व स्थूल-सूक्ष्म देहांविषयी अभिमानरहित होऊन रहातो. त्याच्याकडे पहाणाराना तो इतरांप्रमाणेच व्यवहारी आहे, असे वाटते, पण वस्तुतः तो तसा नसतो " २. गुरूपदेशद्वारा प्राप्त झालेल्या उत्तम व सुषुम्नानाडीरूप असल्यामुळे अति सूक्ष्म अशा मार्गाचे मीं अनुष्ठान केलें. कारण ह्या मार्गाच्या अवलबनाने धीर ब्रह्मज्ञानी पुरुष ससारापासून मुक्त होऊन ब्रह्मरन्ध्रनावाच्या उत्तम पदाला जातात ३. शुक्ल, नील इत्यादि अनेक रंगांच्या नाड्यानीं ते स्थान विचित्र झालें आहे. ह्या सुषुम्ना मार्गाचेच अनुष्ठान ब्रह्मदेवाने मजकडून करविलें; पुण्याचरणी आणि विराड्रूप झालेला ब्रह्मज्ञानी त्याच मार्गाने जातो. ] ४३.

**प्रापश्यद्विश्वमात्मेत्ययमिह पुरुषः शोकमोहाद्यतीतः**
**शुक्रं ब्रह्माध्यगच्छत्स खलु सकलवित्सर्वसिद्ध्यास्पदं हि ।**
**विस्मृत्य स्थूलसूक्ष्मप्रभृतिवपुरसौ सर्वसंकल्पशून्यो**
**जीवन्मुक्तस्तुरीयं पदमधिगतवान्पुण्यपापैर्विहीनः ॥ ४४ ॥**

**अन्वयार्थ—**' इह शोकमोहाद्यतीतः अयं पुरुषः विश्वं आत्मा इति प्रापश्यत् '—या देहामध्यें असतांनाच सर्व शोक व मोह यांचा त्याग करून हा पुरुष हें विश्व आत्मा आहे, असें पाहतो.—' ( तथा ) शुक्रं ब्रह्म अध्यगच्छत् '—त्याच-प्रमाणें [ हिरण्यगर्भनांवाच्या ] शबलब्रह्माची त्याला प्राप्ति होते.—' तथा सः खलु सकलवित् सर्वसिद्ध्यास्पदं हि ( जातः ) '—खरोखर तो सर्वज्ञ पुरुष सर्व सिद्धींचें स्थानच होतो.—' असौ स्थूल-सूक्ष्मप्रभृति वपुः विस्मृत्य सर्वसंकल्प-शून्यः सन् तुरीयं पदं अधिगतवान् '—तसेंच हा पुरुष स्थूल, सूक्ष्म इत्यादि

शरीरांस विसरून सर्वहि मनोवासनांचा त्याग करून तुरीयपदाची प्राप्ति करून घेतो.–' ( ततः ) पुण्यपापैः विहीनः जीवन्मुक्तः ( भवति ) '–नंतर तो पुण्यपापरहित होऊन जीवन्मुक्त होतो. [ आचार्य पूर्वनिर्दिष्ट जीवन्मुक्ताचे प्रतिपादन करणाऱ्या "यस्मिन्सर्वाणि भूतानि०" ह्या ईशावास्योपनिषद् श्रुतीचा अनुवाद करून म्हणतात—हा पुरुष ह्या देहामध्ये असतांनाच सर्वहि सांसारिक शोक व मोह ह्यांचा त्याग करून हे सर्वहि विश्व आत्माच ( म्हणजे ब्रह्मरूप) आहे, असें पहातो. म्हणजे त्या सूक्ष्मदृष्टि पुरुषाचा मोह सर्वथैव नष्ट झाल्यामुळें, केवळ भ्रमाने भासणारे हे जगत् त्याला जगद्रूपाने न दिसतां ब्रह्मरूपानें दिसते व अभ्यासाने त्याची दृष्टि ह्या सर्व सृष्ट पदार्थांत अत्यत गुप्त असणाऱ्या तत्त्वाला पहाण्याइतकी सूक्ष्म झाल्यामुळे सर्वहि जगत् स्वात्मरूप आहे, असें तो पहातो. म्हणूनच हिरण्यगर्भनावाच्या शबल ब्रह्माची त्याला प्राप्ति होते. म्हणजे तो स्वतःच हिरण्यगर्भ ( सूत्रात्मा ) होतो. त्यामुळेच त्याचे ठिकाणीं सर्वज्ञत्व येतें व त्याला अणिमा, लघिमा इत्यादि यौगिक अष्टसिद्धि प्राप्त होतात. त्याचप्रमाणे हा पुरुष स्थूल, सूक्ष्म आणि कारण हीं शरीरें विसरून व सर्वहि शुभाशुभ वासना सोडून शुद्ध व निरंतर अशा आत्मसुखाचा अनुभव घेतो. नतर इतक्या सर्व गुणांनीं युक्त असणाऱ्या ह्या जीवन्मुक्त पुरुषाला पुण्य-पाप स्पर्शहि करीत नाहीं. म्हणजे त्याचीं संचित व क्रियमाण कर्मे दग्ध होतात. वर निर्दिष्ट केलेल्या ईशोपनिषदातील श्रुतीचे बहुतेक तात्पर्य ह्या श्लोकामध्ये आलेंच आहे. म्हणून विस्तार करीत नाहीं. [ ईशोपनिषद्भाष्यार्थ पृ. २२ पहा ] ४४.

**यः सत्त्वाकारवृत्तौ प्रतिफलति युवा देहमात्रावृतोऽपि**
**तद्धर्मैर्बाल्यवार्द्धक्यादिभिरनुपहतः प्राण आविर्बभूव ।**
**श्रेयान् साध्यस्तमेतं सुनिपुणमतयः सत्यसंकल्पभाजोऽ-**
**प्यभ्यासाद्देवयन्तः परिणतमनसा साकमूर्ध्वं नयन्ति ॥४५**

**अन्वयार्थ—**' यः युवा सत्त्वाकारवृत्तौ प्रतिफलति प्राणः आविर्बभूव '–जो आत्मा अंतःकरणांत प्रतिबिंबित होतो, तोच प्राण होय.–' (सः) देहमात्रावृतः अपि तद्धर्मैः बाल्यवार्द्धक्यादिभिः अनुपहतः सन् श्रेयान् ( च ) साध्यः (अस्ति) '–तो देहेंद्रियांनीं आच्छादित झालेला असला तरी त्यांच्या बाल्य, वार्द्धक्य इत्यादि धर्मांनीं लिप्त होत नसून कल्याणरूप व साध्य आहे.–' तं सत्यसंकल्पभाजः

सुनिपुणमतयः अपि अभ्यासात् देवयन्तः परिणतमनसा साकं ऊर्ध्वं नयन्ति'— त्याला कुशल बुद्धीचे केवल ब्रह्मविषयींच संकल्प करणारे व अभ्यासानें देवत्वप्राप्ति करून घेण्याची इच्छा करणारे पुरुष एकाग्र अंतःकरणासहवर्तमान ऊर्ध्वलोकीं ( ब्रह्मरंध्रांत ) नेतात. [ श्रीमत् आचार्य आतां ह्या श्लोकामध्यें जीवन्मुक्ताचें मन व प्राणहि अधोगतीला न जाता ऊर्ध्व गतीला जातात, असे ऋग्वेदस्थ "युवा सुवासाः परिवीत०" इत्यादि श्रुतीच्या आधारानें सांगतात—जो आत्मा पंचमहाभूताच्या सत्त्वगुणांशापासून उत्पन्न झालेल्या अंतःकरणांत प्रतिबिंबित होतो तोच जीव होय. तो देहेंद्रियांनीं वेष्टित झाला तरी बाल्य, यौवन इत्यादि देहधर्म व अंधत्व, बधिरत्व इत्यादि इंद्रियधर्म यानीं लिप्त होत नाहीं. तो अत्यंत कल्याणरूप असून त्याची प्राप्ति करून घेता येते. ( तद्रूप होतां येतें. ) अशा त्या प्राणाला, सूक्ष्मबुद्धि पंडित, सत्य अशा ब्रह्माचे ठिकाणीं मनोवृत्ति ठेवणारे उत्तम साधक व पूर्वीं बेचाळीसावे श्लोकात सांगितलेल्या द्विविध अभ्यासाने देवत्वप्राप्ति करून घेणारे मुमुक्षु संस्कारांच्या योगानें अत्यंत निर्मल झालेल्या अंतःकरणासहवर्तमान ऊर्ध्वश्लोकीं नेतात; म्हणजे सुषुम्नानाडीच्या द्वारा ब्रह्मरन्ध्रांत नेतात. ] ४९.

**प्रायोऽकामोऽस्तकामो निरतिशयसुखायात्मकामस्तदाऽसौ**
**तत्प्राप्तावाप्तकामः स्थितचरमदशस्तस्य देहावसाने ।**
**प्राणा नैवोत्क्रमान्ति क्रमविरतिमिताः स्वस्वहेतौ तदानीं**
**कायं जीवो विलीनो लवणमिव जलेखण्ड आत्मैव पश्चात् ॥**

**अन्वयार्थ**—' ( जीवन्मुक्तः पुरुषः ) प्रायः अकामः ( यतः ) अस्तकामः'— जीवन्मुक्त पुरुष बहुतकरून निष्काम असतो. कारण त्याच्या सर्वहि तृष्णा नष्ट झालेल्या असतात.—' तदा असौ निरतिशयसुखाय आत्मकामः '—त्यावेळीं हा पुरुष परमानंदप्राप्ति होण्याकरिता आत्मप्राप्तीचीच इच्छा करितो—' तत्प्राप्तौ स्थितचरमदशः सन् आप्तकामः '— व आत्म्याची प्राप्ति झाली असतां त्याची अंत्यावस्था सिद्ध होऊन त्याच्या सर्वहि तृष्णा पूर्ण होतात.—' देहावसाने तस्य प्राणाः नैव उत्क्रमन्ति ( किंतु ) स्वस्वहेतौ क्रमविरतिं इताः ( भवन्ति )'— मरणसमयीं त्याचे प्राण निघून जात नाहींत, तर ते आपापल्या कारणामध्यें [illegible] लीन होतात.—' तदानीं क अयं जीवः ( न कापि यतः ) जले लवणं इव

विलीन:'– तेव्हां हा जीव कोठें असतो ? अर्थात् कोठेंहि नाहीं. कारण जला-मध्यें लवण जसें विरून जातें, तसा तो स्वकारणामध्ये लीन होतो.–' पश्चात् अखण्ड आत्मा एव'– व असे झाल्यानतर तो अखंड आत्माच होय. [ आतां निर्वाण मुक्ति कशी प्राप्त होते ते सांगतात—पूर्वी ज्या जीवन्मुक्ताचे निरूपण केलें तो जीवन्मुक्त पुरुष नियमाने नाही, तरी बहुतकरून निष्कामच असतो. कारण दृढाभ्यासाने आत्मरूप झालेल्या मनाची विक्षेपशक्ति नाहींशी झाल्या-मुळें तज्जन्य सर्व तृष्णाहि नाहीशा होतात. असे जरी आहे तरी परमानदरूप आत्म्याची प्राप्ति झाली असतां हा पुरुष निरिच्छ होतो. कारण परमानंदामध्यें बाकीच्या सर्व क्षुद्र आनदांचा अतर्भाव होणे साहजिक आहे. भगवानानीहि 'यं लब्ध्वा चापरं लाभ मन्यते नाधिक ततः'–ज्या परमानदरूप योगाची प्राप्ति झाली असतां त्याहून दुसरा एखादा अधिक लाभ आहे, असे त्याला वाटत नाहीं, असे म्हटले आहे. नंतर त्याची अगदीं शेवटची अवस्था सिद्ध होते; म्हणजे देहसंबंध असल्यामुळे मुख्य विदेह -मुक्तीहून थोडयाशा अली-कडच्या अवस्थेमध्ये तो राहतो. अशा ह्या जीवन्मुक्ताचा मरणकाल प्राप्त झाला असतां त्याचे प्राण हे शरीर सोडून जात नाहींत. पुनः जन्म घेण्याकरितां संचिताचा साठा बरोबर घेऊन ज्यावेळीं मन देहाला सोडून जातें, तेव्हां त्याला प्राणोत्क्रमण असे म्हणतात; परंतु जीवन्मुक्त पुरुषाचे सर्व संचित व क्रियमाण कर्म ज्ञानाग्नीने दग्ध झाल्यामुळें त्याला पुनर्जन्म घ्यावयाचा नसतो. म्हणून त्याच्या प्राणांचें उत्क्रमणहि होत नाहीं. तर त्यांची ज्या ज्या तत्त्वापासून उत्पत्ति झालेली असते, त्या त्या तत्त्वामध्ये ते उत्पत्तीच्या क्रमानेंच लीन हो-तात. त्यावेळी मग हा जीव कोठून रहाणार ? कारण उदकांत लवण जसें लीन होतें तसाच हा स्वतःच्या उपादान कारणांत लीन होतो. मग हा जीव आणि हा आत्मा, असा भेद पाडणारी त्याची उपाधि नष्ट झाल्यामुळें तो स्वतः अखंड आत्माच होऊन राहतो. 'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति' ( सु. उ. सं. पृ. ६९१ )–जीव प्रथमतः ब्रह्मच असून मध्येच जीवदशेत येतो व पुनः ब्रह्माला मिळतो ' अशी श्रुतिहि आहे. ] ४६.

पिण्डीभूतं यदन्तर्जलनिधिसलिलं याति तत्सैन्धवाख्यं
भूयः प्रक्षिप्तमस्मिन्विलयमुपगतं नामरूपं जहाति ।
प्राज्ञस्तद्वत्परात्मन्यथ भजति लयं तस्य चेतो हिमांशौ
वागग्नौ चक्षुरर्के पयसि पुनरसृग्रेतसी दिक्षु कर्णौ ॥ ४७ ॥

**अन्वयार्थ**—' यत् पिण्डीभूतं अन्तर्जलनिधिसलिलं तत् सैन्धवाख्यं याति ' —जें शुष्क होऊन खड्यासारखें घट्ट झालेलें समुद्राचें पाणी, त्यालाच सैन्धव ( मीठ ) असें म्हणतात.—' भूयः ( तत् ) अस्मिन् प्रक्षिप्त विलयं उपगतं सत् नामरूपं जहाति '—व तेच पुन. पाण्यांत टाकिले असतां विरघळून जाऊन आपलें नामरूप सोडिते.—'तद्वत् प्राज्ञः परात्मनि लय भजति '—त्याचप्रमाणें जीव परमात्म्याचे ठिकाणीं लय पावतो.—' अथ तस्य चेतः हिमांशौ वाक् अग्नौ चक्षुः अर्के पुनः असृग्रेतसी पयसि कर्णौ दिक्षु विलय ( भजतः ) '—तसेच क्रमाने त्याचें अंतःकरण चंद्रामध्यें, वाणी अग्नीमध्ये, नेत्र सूर्यामध्ये, तर रक्त व रेत उदकामध्ये आणि कर्ण दिशांमध्ये लय पावतात. [ मागच्या श्लोकांतील लवणाचा दृष्टान्त आता येथे स्पष्ट करितात—समुद्रांतील उदकाचाच सैंधव हा एक विकार आहे. पण तो सैंधवरूपाने भासूं लागला असतां त्याचें पूर्व नामरूप जाऊन लवण हे नांव, पांढरे रूप व शुष्क खडयासारखा आकार, हीं त्याला येतात म्हणजे याची उत्पत्ति उदकापासून झाली असेल, असे कोणालाहि वाटत नाही. पण तेच लवण कारणभूत उदकांत टाकिले असता पुनः आपल्या मूळच्या रूपाला प्राप्त होऊन आपले नामरूप टाकिते. तसेच प्राज्ञ—प्रत्यगात्मा सच्चिदानंदस्वरूपांत मिळतो व त्याचें नाम, रूप, वर्ण, आश्रम इत्यादि सर्व नष्ट होतात आणि असे झाले असतां त्या प्रत्यगात्म्याला जीवत्व प्राप्त करून देणारें अंतःकरण, वाणी, नेत्र, रक्त, रेत इत्यादिकांचा त्यांच्या त्यांच्या कारणांमध्यें लय होतो. सारांश—ज्याप्रमाणे उदकांत टाकिलेला मिठाचा खडा त्यांत विरून गेला असता, पुनः बाहेर काढूत पृथक्पणे दाखवितां येत नाहीं, त्याचप्रमाणें चित्तादिक उपाधींचा लय होऊन प्रत्यगात्मा स्वरूपाला जाऊन मिळाला असता त्याला पुनः जीवत्वदशा प्राप्त होत नाहीं. बृहदारण्यक श्रुतींत ( २.४ पृ. १९८ ) भगवान् याज्ञवल्क्यांनीं मैत्रेयीनामक ज्येष्ठ पत्नीला हाच जल-लवणाचा दृष्टान्त देऊन उपदेश केला आहे. त्याचप्रमाणें आर्तभागनामक जरत्कारुपुत्रानें—" जीवन्मुक्त पुरुष मृत झाला असता, त्याची वाणी अग्नीमध्ये, नेत्र सूर्यामध्यें, मन चंद्रामध्यें, कर्ण दिशांमध्ये, इत्यादि आपल्या म्हणण्याप्रमाणें स्व-स्व-कारणामध्ये जर प्रविष्ट होत असतील तर त्यावेळीं हा जीव कोठे राहतो " असा याज्ञवल्क्यांस प्रश्न केला आहे. शिवाय ऐतरेयोपनिषदामध्ये " अग्नि वाणी होऊन मुखांत, वायु प्राण होऊन नासिकेमध्यें, आदित्य चक्षु होऊन नेत्रांत, दिशा श्रोत्र होऊन कर्णामध्यें, औषधि व वनस्पति लोम होऊन

त्वचेमध्यें व आप रेत होऊन शिश्नामध्यें प्रविष्ट होतें " असें स्पष्ट सांगितलें आहे. ] ४७.

**क्षीरान्तर्यद्वदाज्यं मधुरिमविदितं तत्पृथग्भूतमस्मा-**
**द्भूतेषु ब्रह्म तद्वद्व्यवहृतिविदितं श्रान्तविश्रान्तिबीजम्।**
**यं लब्ध्वा लाभमन्यत्तृणमिव मनुते यत्र नोदेति भीतिः**
**सान्द्रानन्दं यदन्तःस्फुरति तदमृतं विद्ध्यतो ह्यन्यदार्तम्॥**

**अन्वयार्थ**—' यद्वत् क्षीरान्तः आज्यं मधुरिमविदित तत् अस्मात् पृथग्भूतं' —ज्याप्रमाणे दुधांत असणारे घृत त्याच्या माधुर्यावरून समजते व ते दुग्धाहून पृथक् असते–' तद्वत् भूतेषु ब्रह्म व्यवहृतिविदित श्रान्तविश्रान्तिबीज (अस्ति)' –त्याप्रमाणे सर्व भूतांमध्ये ब्रह्म आहे व ते सर्वभूतांच्या व्यवहारावरून समजते. ( अर्थात् ते पृथक् आहे. ) ते श्रांत पुरुषाच्या निद्रावस्थेतील विश्रांतीचे कारण आहे.–' य लब्ध्वा अन्यत् लाभं तृण इव मनुते '–ज्याची प्राप्ति झाली असतां पुरुष इतर लाभ तृणासारखे मानितो;–' यत्र भीतिः न उदेति '–तसेच ज्या-ठिकाणीं कोणत्याहि प्रकारची भीति उत्पन्न होत नाही–' यत् सान्द्रानन्दं अन्तः स्फुरति '–जें अत्यत आनदरूप तत्त्व आंतल्या आत स्फुरते–' तत् अमृतं विद्धि '–ते अमृत आहे, असे तू जाण.–' अतः अन्यत् आर्तं हि'–याहून इतर सर्व पदार्थ नाशिवत आहेत. [ आतां ह्या श्लोकामध्ये विश्वातील सर्व प्राण्यांचा व्यवहार आत्मसबंधानेच होत असतो, असे सांगतात—दुधामध्यें घृत असतें व तें दुधाच्या मिष्टपणावरून समजते. ते घृत दूध या पदार्थाहून भिन्न आहे, असें मथनानतर प्रत्यक्ष अनुभवाला येते. पण ज्याप्रमाणें तेच दुधापासून काढिलेले घृत पुनः दुधामध्यें टाकिले असतां त्यांत मिळून जात नाहीं, त्याच-प्रमाणें सर्व सृष्ट पदार्थांमध्ये ब्रह्म आहे; त्याचे सर्व प्राण्यांच्या व्यवहारावरून ज्ञान होतें आणि म्हणूनच तें सर्वेहि भूताहून भिन्न आहे. ज्ञानी पुरुषाला तें पृथक् आहे, असा अनुभव आला म्हणजे तो जरी जगांतील सृष्ट पदार्थांकडे पहात असला, तरी त्यांच्याहून पृथक् असलेल्या ब्रह्माला कधींहि विसरत नाहीं. हे ब्रह्म जागृतींत अनेक व्यवहार करून श्रमलेल्या पुरुषाच्या सुषुप्ती-मध्यें प्राप्त होणाऱ्या विश्रांतीला कारण होतें. ज्याची प्राप्ति झाली असतां ज्ञानी पुरुष सर्व जगाला तृणासारखें तुच्छ लेखितो; ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं द्वैतभाव नसल्यामुळें व्यवहाराप्रमाणें तेथें कोणतीहि भीति नसते, ज्याच्या योगानें मिश्र-

वस्थेमध्ये स्थूल-सूक्ष्म प्रपंचाचा लय होऊन मन आत्मरूप होतें व ज्यामुळें अत्यंत आनंदरूप वस्तूचा अंतःकरणांत प्रकाश पडतो ते अमृत ( ब्रह्म ) आहे, असे समज. त्याच्याहून दुसरे सर्वहि पदार्थ क्षुद्र आहेत. कारण शुक्तिकेच्या ठिकाणीं भासणाऱ्या रजताप्रमाणे त्यांच्या अधिष्ठानाचे ज्ञान झाले असतां त्यांचा बाध होतो. सारांश, केवल उदकमय दुग्धामध्यें जे उदकाहून अगदी निराळे असें माधुर्य अनुभवाला येते, ते घृताचेच होय, उदकाचे नव्हे हे प्रसिद्ध आहे. तसेच या जड देहामध्ये जे चलनादिक व्यापार व इंद्रियांमध्यें जी विषयग्रहणशक्ति आहे, ती आत्म्याचीच आहे, शरीराची नव्हे; कारण मृत शरीर नेश्चेष्ट असते, हे प्रसिद्ध आहे. ] ४८.

**ओतः प्रोतश्च तन्तुष्विह विततपटश्चित्रवर्णेषु चित्र-**
**स्तस्मिञ्जिज्ञास्यमाने ननु भवति पटः सूत्रमात्रावशेषः ।**
**तद्वद्विश्वं विचित्रं नगनगरनरग्रामपश्वादिरूपं**
**प्रोतं वैराजरूपे स वियति तदपि ब्रह्मणि प्रोतमोतम् ॥४९**

**अन्वयार्थ**—' इह चित्रवर्णेषु तन्तुषु चित्रः विततपटः ओतः प्रोतश्च ( दृश्यते ) '—ह्या व्यवहारात रंगीबेरंगी तंतूमध्ये ( धाग्यांमध्ये ) रंगीबेरंगी विस्तृत वस्त्र ओतप्रोत ( भरून राहिलेले ) दिसते.—' तस्मिन् जिज्ञास्यमाने ननु पटः सूत्रमात्रावशेषः भवति'— पण त्या वस्त्राविषयीं विचार करून पाहूं लागले असतां त्यामध्यें खरोखरच केवल धागे मात्र हातीं लागतात ( म्ह० धाग्यांवाचून त्यांत दुसरे कांहीं दिसत नाहीं. ) '—तद्वत् नगनगरनरग्रामपश्वादिरूपं विचित्रं विश्वं वैराजरूपे प्रोतं '—त्याचप्रमाणे पर्वत, नगरें, पुरुष, लहान लहान गांवे, पशु इत्यादि रूप हें विचित्र जगत् विराडात्म्याच्या शरीरामध्ये ओविलेले आहे. —'सः वियति ( प्रोतः )—' तो विराडात्मा आकाशांत ओंविलेला आहे व—' तत् अपि ब्रह्मणि ओतं प्रोतं ( दृश्यते )'—ते आकाशहि ब्रह्मामध्यें ओंविलेले आहे. [ हें विश्व परंपरेनें ब्रह्मामध्येंच ओविलेले आहे, असें ह्या श्लोकांत दाखवितात—व्यवहारामध्ये बहुतेक सर्व मनुष्यांच्या परिचयाचें लांब-रुंद वस्त्र तंतुमय असतें. वस्त्रोत्पत्तीच्या पूर्वी, वस्त्ररूपाला प्राप्त झाल्यावर व वस्त्रत्वाचा नाश झाला असतां तें तंतुरूपच असतें व जसे धागे असतील तशा प्रकारचें तें होतें. चित्र-विचित्र धागे असल्यास वस्त्रहि तसेंच होतें. पण वस्त्र या नांवानें व लांबीरुंदीच्या आकारानें भासणारें जें वस्त्र तो केवळ तंतूंचीं

विकार आहे. उभ्या तंतूंमध्यें आडवे तंतु विशेष प्रकारानें ओंवून विणले असतां त्याच तंतूंस वस्त्र ही संज्ञा प्राप्त होते. म्हणून पटाविषयीं विचार करून पाहूं लागलें असतां त्यामध्ये तंतूवाचून दुसरें कांहींहि नाहीं, असा आपला निश्चय होतो. त्याचप्रमाणे सत्त्वादि गुण व पाप-पुण्य उत्पन्न करणारीं कायिक, वाचिक व मानसिक कर्मे यांच्या वैचित्र्यामुळे विचित्र झालेले हे जगत् विराड्नांवाच्या स्थूल समष्टीमध्ये ओंविलेले आहे; ती स्थूल समष्टि सूक्ष्म आकाशामध्यें ओंविलेली आहे ( म्हणजे ती आकाशाच्या आधाराने रहाते ) व तें सर्वहि स्थूल-सूक्ष्म प्रपचाला आधार असणारे आकाश ब्रह्माच्या आश्रयाने राहते. याविषयीं बृहदारण्यकोपनिषदामध्ये "स होवाच यदूर्ध्व....तद्श्नाति कश्चन" ( सु. उ. स. पृ० ६३६ ) या श्रुतीमध्ये प्रश्नप्रतिवचनरूपाने सविस्तर प्रतिपादन केलेले आहे. ] ४९.

**रूपं रूपं प्रतीदं प्रतिफलनवशात्प्रातिरूप्यं प्रपेदे**
**ह्येको द्रष्टा द्वितीयो भवति च सलिले सर्वतोऽनन्तरूपः ।**
**इन्द्रो मायाभिरास्ते श्रुतिरिति वदति व्यापकं ब्रह्म तस्मा-**
**ज्जीवत्वं यात्यकस्मादतिविमलतरे बिम्बितं बुद्ध्युपाधौ ॥५०**

**अन्वयार्थ**—' इद प्रतिफलनवशात् रूप रूप प्रातिरूप्यं प्रपेदे'– हे ब्रह्म प्रतिबिंबाच्या योगाने उपाधीप्रमाणे निरनिराळ्या रूपांचे झालें.—'एको हि द्रष्टा सलिले द्वितीयः भवति '–( जलाशयाचे तीरीं उभे राहून उदकांत ) पहाणारा एकच पुरुष स्वतःचेच रूप उदकामध्यें दिसूं लागल्यामुळें अनेक होतो–' इन्द्रः मायाभिः सर्वतः अनन्तरूपः आस्ते इति च श्रुतिः वदति '–व इंद्र मायेच्या योगानें अनत रूपें घेतो, असे श्रुति सागते.–' तस्मात् व्यापक ब्रह्म अतिविमलतरे बुद्ध्युपाधौ बिम्बितं अकस्मात् जीवत्वं याति'– तस्मात् सर्वव्यापि ब्रह्मच अति निर्मल अशा बुद्धिरूप उपाधींमध्यें बिंबित झाले असतां तत्क्षणींच जीव होतें. [ आतां ह्या श्लोकामध्ये 'एकच बिंब अनेक प्रतिबिंबांमध्ये असतें' ह्या न्यायानें आत्म्याचे सर्वात्मकत्व दाखवितात. ह्या ठिकाणीं "दध्यङ् आथर्वण० " " सलिल एको द्रष्टा० " " इन्द्रो मायाभिः० " ह्या प्रतिबिंबविषयक तीन श्रुतींचा निर्देश केला आहे. ब्रह्म ज्या ज्या उपाधींमध्यें प्रतिबिंबित झालें त्या त्या उपाधीप्रमाणें भासूं लागलें ह्या पाहिल्या श्रुतीविषयीं वेदांत अशी आख्यायिका आहे कीं, पूर्वी देवांचे अश्विननांवाचे दोन वैद्य आत्मज्ञा-

नाचा उपदेश घेण्याकरितां दधीचि ऋषीकडे गेले व ' आम्हांस आत्मविषयीचा उपदेश करा ' अशी त्यांनीं त्यांना विनंति केली. त्यावर दधीचि ऋषींनीं पुन: केव्हां तरी उपदेश करीन, असे उत्तर दिले. ते ऐकून ते उभयतां स्वस्थानीं निघून गेले. इतक्यांत इंद्र दधीचींकडे आला व माझ्या वैद्याना तुम्ही उपदेश करू नका आणि जर हे माझे म्हणणे अमान्य करून तुम्ही उपदेश कराल, तर मी तुमचा शिरश्छेद करीन, असे बोलून निघून गेला. तदनंतर कांहीं कालाने ते उभयतां वैद्य पुनः दधीचीकडे आले असता त्याने त्यांना झालेला वृत्तांत सांगितला. तो ऐकून ते वैद्य म्हणाले कीं, महाराज, आपण पुन: केव्हां तरी उपदेश करीन, असे जे सांगितलेत ते असत्य होणे योग्य नाहीं. याकरितां आम्हीं आपले हे मस्तक कोठे तरी लपवून ठेवून येथे अश्वाचे शिर आणून बसवितो. त्या अश्वमुखाने आपण आम्हाला उपदेश करा. नंतर इंद्र आपला शिरश्छेद करून निघून गेला, म्हणजे आम्ही आपले मस्तक पुन: जोडून देऊं. हें त्यांचे भाषण ऐकून दधीचि ऋषींनी तसे करण्यास वैद्यास अनुमोदन दिले आणि नंतर अश्वमुखाने त्यांनीं त्याना उपदेश केला. त्या उपदेशामध्ये " रूपं रूपं प्रतिरूपो बभूव " ही श्रुति आहे. नदीच्या किंवा जलाशयाच्या तीरीं एकच पुरुष उदकातील प्रतिबिंबरूपाने आपणाला अनेकत्वाने पहातो. परमात्मा आपल्या मायाशक्तीच्या योगाने अनेकरूप झाला. साराश सर्वव्यापि सर्व प्रतिबिंबाना व्यापून असणारें ब्रह्मच अति निर्मल बुद्धीमध्ये प्रतिबिंबित झाले असतां जीव होते व अनेक उपाधीमुळे त्याचे ठिकाणीं अनेकत्व येते. ] ५०.

**तज्ज्ञाः पश्यन्ति बुद्ध्या परमबलवतो माययाक्तं पतङ्गं**
**बुद्धावन्तः समुद्रे प्रतिफलितमरीच्यास्पदं वेधसस्तम् ।**
**यादृग्यावानुपाधिः प्रतिफलति तथा ब्रह्म तस्मिन्यथास्यं**
**प्रासादर्शानुरूपं प्रतिफलति यथाऽवस्थितं तत्सदैवम् ५१**

**अन्वयार्थ**—'तज्ज्ञाः परमबलवतः मायया आक्तं त पतङ्ग बुद्धौ समुद्रे अन्तः वेधसः प्रतिफलितमरीच्यास्पदं बुद्ध्या पश्यन्ति '—शास्त्रज्ञ पुरुष अत्यंत बलवान् अशा हिरण्यगर्भाच्या मायेनें मोहित झालेला तो पतंग—जीव बुद्धिरूप समुद्रामध्यें प्रतिबिंबित झालेले आरम्याचे जे किरण तद्रूप आहे, असे निश्चयात्मक अंतःकरणवृत्तीनें पहातात.—'यथा आस्यं प्रासादर्शानुरूपं प्रतिफलति तद् (पुनः)

सदा यथावस्थितं '—जसें मुख समोर आलेल्या आरशाप्रमाणें त्यामध्यें प्रतिबिंबित होते व तें स्वतः तर सर्वदा जसेच्या तसेंच असतें,—' एवं यादृक् यावान् उपाधिः तथा तस्मिन् ब्रह्म प्रतिफलति '—तसेच जेवढ्या प्रमाणाची व जशा प्रकारची उपाधि असेल तसेच तेथे ब्रह्म प्रतिबिंबित होतें. [ मागच्या श्लोकामध्यें प्रतिपादन केलेल्या अर्थाला अनुरूप अशा ऋग्वेदस्थ " पतंगमक्तमसुरस्य... इच्छन्ति वेधसः" या श्रुतीचा येथे अनुवाद करितात—बुद्धिरूप समुद्रामध्यें सच्चिदानदस्वरूप परमात्मा प्रतिबिंबित होतो. परमात्म्याच्या दुर्लंघ्य मायेनें मोहित झाल्याने त्यालाच जीव, असे नांव प्राप्त होतें. तोच पतग होय. कारण स्वरूपापासून भ्रष्ट होणें, हा त्याचा स्वभावच आहे. जीव त्या परमात्म्याच्या प्रतिबिंबभूत आहे, असे शास्त्रज्ञ पुरुष निश्चयात्मक बुद्धिवृत्तीनें पहातात. मुखासमोर तांबडा, पिवळा, मलिन किंवा स्वच्छ इत्यादि जशा प्रकारचा आरसा धरावा तसें त्यामध्यें ( आरशाच्या रंगाप्रमाणे ) मुखाचें प्रतिबिंब पडतें; पण बिंबभूत मुख तर सर्वदा जसेच्या तसेच असते. तसेंच उपाधिभूत अंत:करण जसें सात्त्विक, राजस किंवा तामस असेल, त्याप्रमाणे ब्रह्म त्यात प्रतिबिंबित होते. पण दृष्टान्तांतील मुखाप्रमाणे बिंबभूत ब्रह्म त्रिकालींहि अविकारि ( स्वस्वरूपाने जशाच्या तसेच ) असते. ] ५१.

एको भानुस्तदर्थप्रतिफलनवशाद्यस्त्वनेकोदकान्त-
नानात्वं यात्युपाधिस्थितिगतिसमतां चापि तद्वत्परात्मा ।
भूतेषूच्चावचेषु प्रतिफलित इवाभाति तावत्स्वभावा-
वच्छिन्नो यः परंतु स्फुटमनुपहतो भाति तावत्स्वभावैः ५२

**अन्वयार्थ**—' यः तु एकः भानुः अनेकोदकान्तः तदर्थप्रतिफलनवशात् नानात्वं याति '—जो एकच सूर्य अनेक उदकपूर्ण पात्रांमध्यें स्वतः प्रतिबिंबित झाल्यामुळें अनेकत्वाने भासतो—'उपाधिस्थितिगतिसमतां च अपि ( याति )' — आणि उपाधि असेपर्यंत असणें, उपाधि नष्ट झाली असता नष्ट होणें, इत्यादि उपाधिधर्माशीं साम्य पावतो;—' तद्वत् परात्मा उच्चावचेषु भूतेषु प्रतिफलित इव आभाति '—तसेच, परमात्मा लहान-मोठ्या भूतांमध्ये प्रतिबिंबित झाल्यासारखा भासतो.—' यः तावत् स्वभावावच्छिन्नः परतु स्वभावैः तावत् अनुपहतः स्फुटं भाति '—जो उपाधीच्या स्वभावाने तर युक्त होतो; पण स्वतःच्या स्वभावांनींहि ( कधीं ) हीन होत नाहीं, असें स्पष्ट दिसतें. [ आतां हीच गोष्ट

सूर्याच्या दृष्टान्तानें पुनः स्पष्ट करितात—अनेक पात्रांमध्यें पाणी भरून तीं पात्रें उघड्या जागेंत ठेविलीं असतां त्या प्रत्येकामध्यें निरनिराळा सूर्य दिसूं लागतो. पात्रांतील उपाधिभूत उदक हालू लागले असता ते प्रतिबिंबहि हालत आहे, असें भासतें व उदक ओतून टाकिलें असतां ते नष्ट झालें, असे वाटतें. परंतु ह्या विक्रियापैकीं बिंबभूत सूर्याला कोणतीच विक्रिया होत नाहीं. तसेच सर्वहि लहान-मोठया शरीरातील अतःकरणामध्यें परमात्मा प्रतिबिंबित झाल्यासारखा भासतो व अनेक अत करणोपाधींमुळे तो जीवरूपाने अनेक असल्यासारखा वाटतो. अंतःकरणरूप उपाधि असेपर्यंत जीवाचे अस्तित्व असते. अतःकरण सुखी किंवा दुःखी झाले असतां जीवहि सुखी किंवा दु खी झाल्यासारखा वाटतो. परतु ज्याप्रमाणें उदकोपाधीच्या धर्मानीं सूर्यप्रतिबिंबें युक्त झालीं तरी स्वतःचे प्रकाशत्व टाकीत नाहींत, त्याचप्रमाणे सुख-दु.खादि उपाधिधर्मानीं जीव युक्त झाला तरी स्वत चे चैतन्यादि स्वभाव टाकीत नाहीं. ] ५२.

यद्वत्पीयूषरश्मौ दिनकरकिरणैर्बिम्बितैरेति सान्द्रं
नाशं नैशं तमिस्रं गृहगतमथवा मूर्छितैः कांस्यपात्रे ।
तद्वद्बुद्धौ परात्मद्युतिभिरनुपदं बिम्बिताभिः समन्ता-
द्भासन्ते हीन्द्रियास्यप्रसृतिभिरनिशं रूपमुख्याः पदार्थाः॥

**अन्वयार्थ**—‘ यद्वत् पीयूषरश्मौ बिम्बितैः दिनकरकिरणैः सान्द्रं नैशं तमिस्रं नाशं एति ’–ज्याप्रमाणे चद्रामध्यें प्रतिबिंबित झालेल्या सूर्यकिरणांनीं रात्रींचा दाट अंधकार नाश पावतो;–‘ अथवा कांस्यपात्रे मूर्छितैः ( दिनकरकिरणैः ) गृहगत ( तमिस्रं नाशं एति ) ’–किंवा कांशाच्या भांड्यामध्ये प्रतिबिंबित झालेल्या सूर्यकिरणांनीं गृहांतील अंधकार नाहींसा होतो;–‘तद्वत् बुद्धौ बिम्बिताभिः अनुपदं इन्द्रियास्यप्रसृतिभिः परात्मद्युतिभिः रूपमुख्याः पदार्थाः समन्तात् अनिशं भासन्ते ’–त्याप्रमाणे बुद्धीमध्ये प्रतिबिंबित होणाऱ्या व तत्काल इंद्रियमुखानी प्रसार पावणाऱ्या परमात्मज्योतींनीं रूपादिक सर्व विषय चोहों-कडून सर्वदा भासतात. [ मागच्या श्लोकांतील प्रतिपादनावर आतां कोणी कदाचित् ‘जलादि उपाधींमध्ये दिसणारे सूर्यप्रतिबिंब स्वतःचे रूप मात्र प्रकट करितें; अन्य पदार्थांना प्रकट करीत नाहीं. तेव्हां आत्मप्रतिबिंबभूत जीव तरी अन्य पदार्थांना प्रकाशित कसा करणार ( म्ह० त्याला त्यांचें ज्ञान कसें होणार )’ अशी शंका घेतील. तिचें दृष्टान्त देऊन समाधान करितात. जल-

मय असणाऱ्या चंद्राच्या ठिकाणीं सूर्यकिरणें पडून त्या किरणांच्या परावर्तनाने रात्रींचा निबिड अंधार नाहींसा होतो; किंवा कांशाचें भांडें, आरसा इत्यादिकांमध्ये प्रतिबिंबित झालेल्या सूर्यकिरणाचे परावर्तन घरामध्ये झालें असतां घरांतील अंधकार नाहींसा होतो, ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाची आहे. किंवा संसर्गानें अग्नींतील दाह जसा लोखडांत येतो त्याचप्रमाणें परमात्म्याची प्रकाशनशक्ति त्याच्याशीं उपाधिरूपाने संबद्ध झालेल्या बुद्धीमध्यें येते. हेंच बुद्धींतील प्रतिबिंब होय. ह्याप्रमाणे संसर्गद्वारा परामात्म्याची ज्ञानशक्ति अंतःकरणांत आली असतां अंतःकरणाशीं संबद्ध असणाऱ्या इंद्रियांमध्येहि ती येते. सारांश—अशा त्या इंद्रियाच्या द्वारा आसपास पसरणाऱ्या आत्मज्योतीनें शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध इत्यादि विषयांचे ज्ञान होते. ] ५३.

**पूर्णात्मानात्मभेदात्त्रिविधमिव परं बुद्ध्यवच्छिन्नमन्य-**
**त्तत्रैवाभासमात्रं गगनमिव जले त्रिप्रकारं विभाति ।**
**अम्भोवच्छिन्नमस्मिन्प्रतिफलितमतः पाथसोन्तर्बहिश्च**
**पूर्णावच्छिन्नयोगे व्रजति लयमविद्या स्वकार्यैः सहैव ॥५४॥**

**अन्वयार्थ**—' अम्भोवच्छिन्न '—पाण्याने वेष्टित होऊन तेवढेच निराळे भासणारे,—' अस्मिन् प्रतिफलित '—पाण्यात प्रतिबिंबित झालेले व—' अतः पाथसः अन्तर्बहिः च '—त्या पाण्याला आंतून व बाहेरून व्यापणारे—'इति जले त्रिप्रकार गगन इव '—असे जलांत तीन प्रकारचे आकाश जसे भासते,—(तथा) 'पर बुद्ध्यवच्छिन्नं अन्यत्तत्रैव आभासमात्र इति इह पूर्णात्मानात्मभेदात् (ब्रह्म) त्रिविध आभाति '—तसेच, एक पूर्ण, दुसरे बुद्ध्यवच्छिन्न व तिसरे बुद्धींतच प्रतिबिंबित झालेले असे ब्रह्महि पूर्ण, आत्मा व अनात्मा अशा तीन भेदांनीं तीन प्रकारचे भासते.—' ( एवं ) पूर्णावच्छिन्नयोगे ( सति ) अविद्या स्वकार्यैः सह एव लय व्रजति '—( ह्याप्रमाणे ) पूर्ण व उपाधिव्यापी अशीं ही तत्त्वे एकच आहेत, असे अखण्ड ज्ञान झाले कीं, आपल्या कार्यासहवर्तमानच अविद्या नाश पावते. [ भगवान् आचार्य उपाधीमध्येच तीन प्रकारची ब्रह्मप्रतीति येते, असें ह्या श्लोकांत सांगतात. ह्या अंतःकरणरूप जीवाच्या उपाधीमध्यें सर्वव्यापि पूर्ण परब्रह्म, आत्मा व अनात्मा अशा तिघांचाहि भास होतो. त्यातून पहिलें जे परिपूर्ण ब्रह्म ते उपाधीच्या आंत बाहेर ओतप्रोत भरलेलें असतें; दुसरें अंतःकरणवेष्टित झाल्यानें तेवढेंच पूर्ण ब्रह्मापासून पृथक् होऊन केवळ

बुद्धीला व्यापून राहतें व तिसरें बुद्धीमध्यें केवळ प्रतिबिंबासारखें भासतें. हीच गोष्ट जास्त स्पष्टपणे लक्षात यावी म्हणून उदकांमध्यें तीन प्रकारांनीं भास-णाऱ्या गगनाचा दृष्टान्त देतात—जलाला आतबाहेर व्यापून राहणारें, जल जेवढें असेल तेवढेच पूर्णाकाशाहून पृथक् भासणारे व त्यांत प्रतिबिंबित होणारें असें एकच आकाश जसें उपाधीमुळे तीन प्रकारचें भासते, तसेच एक पर-ब्रह्म उपाधीमुळे तीन प्रकारचें होतें; पण ज्ञानाच्या योगाने त्याच्या अखंडत्वा-चा ( म्ह० तिन्ही ठिकाणीं भासणारे तत्त्व एकच आहे असा ) निश्चय झाला कीं, तत्क्षणींच उपाधिभूत अविद्या आपल्या प्रतिबिंबादिक कार्यांसह स्वाश्र-यामध्यें जाऊन मिळते. अधिष्ठानाचा साक्षात्कार झाला असतां भ्रम नाहींसा होतो. ] ५४.

**दृश्यन्ते दारुनार्यो युगपदगणिताः स्तम्भसूत्रप्रयुक्ताः**
**संगीतं दर्शयन्त्यो व्यवहृतिमपरां लोकसिद्धां च सर्वाम् ।**
**सर्वत्रानुप्रविष्टादभिनवविभवाद्यावदर्थानुबन्धा-**
**त्तद्वत्सूत्रात्मसंज्ञाद्व्यवहरति जगद्भूर्भुवःस्वर्महान्तम् ॥५५॥**

**अन्वयार्थ**—' युगपत् अगणिताः स्तम्भसूत्रप्रयुक्ता दारुनार्यः संगीतं अपरां लोकसिद्धां सर्वां व्यवहृतिं च दर्शयन्त्यः दृश्यन्ते '—एकाच कालीं कळसूत्राने प्रेरित होणाऱ्या लांकडाच्या असंख्य बाहुल्या नृत्य-गायनादिक व सर्व लौकिक व्यवहार करून दाखवितात, असे दिसते.—' तद्वत् सर्वत्रानुप्रविष्टात् अभिनव-विभवात् यावदर्थानुबन्धात् सूत्रात्मसंज्ञात् भूर्भुवःस्वर्महान्तं जगत् व्यवहरति '—त्याचप्रमाणें सर्वव्यापी, अतर्क्यसामर्थ्यवान् व कर्मानुरूप फल देणारा जो सूत्रात्मसंज्ञक परमात्मा त्याच्याकडून प्रेरित होऊन भूर्भुवःस्वर् व महर्लोकाप-र्यंत सर्व जगत् व्यवहार करितें. [ आतां ह्या सर्व श्लोकांमध्ये सूत्ररूप सर्व व्यापि परब्रह्माचा निर्देश करितात—कळसूत्री बाहुल्यांच्या खेळात एकाच कालीं अनेक बाहुल्यांना सूत्रधार पडद्यामध्ये बसून बारीक तारांच्या योगानें नाचवितो व त्यांच्याकडून मल्लयुद्ध, शिकार, इत्यादि लौकिक व्यवहारहि कर-वितो. तो सूत्रधार बाहुल्यांपासून पडद्यातील खांबापर्यंत शिल्पकाराने जोड-लेल्या तारांच्या द्वारा हे व्यवहार करितो. त्याचप्रमाणें सर्वहि कार्यांमध्यें ओत-प्रोत भरून राहणाऱ्या विश्वव्यापी, अतर्क्यसामर्थ्यवान्, कर्मानुरूप फल देणा-ऱ्या व फलाकरितां देशकालानुरूप व्यवहार करविणाऱ्या सूत्रात्म्याकडून प्रेरित

होऊन भूर्लोकापासून महर्लोकापर्यंत सर्व विश्वांतील प्राणी व्यवहार करितात. तात्पर्य, ' ईश्वरप्रेरणेवांचून वृक्षाचें पानहि हालत नाहीं ' अशी जी लौकिक म्हण आहे ती अगदीं यथार्थ आहे. " वायुर्वै गौतम यत्सूत्रं...सन्दब्धानि भवन्ति " ही बृहदारण्यक श्रुति ह्या श्लोकांतील प्रतिपादनाला प्रमाण आहे. ( बृ. भाष्यार्थ. अ. ३. ब्रा. ७ पृ. १७४ पहा. ) ] ९९.

**तत्सत्यं यत्त्रिकालेष्वनुपहतमदः प्राणदिग्व्योममुख्यं**
**यस्मिन्विश्रान्तमास्ते तदिह निगदितं ब्रह्म सत्यस्य सत्यम् ।**
**नास्त्यन्यत्किंच यद्वत्परमधिकमतो नाम सत्यस्य सत्यं**
**सच्च त्यच्चेति मूर्ताद्युपहितमवरं सत्यमस्यापि सत्यम् ॥५६॥**

**अन्वयार्थ**—' यत् त्रिकालेषु अनुपहत अदः प्राणदिग्व्योममुख्यं तत् सत्यम् '—जे त्रिकालींहि नष्ट न होणारे हे प्राण, दिशा, व्योम इत्यादि अमूर्त जगत् ते सत्य होय.—' ( इद ) यस्मिन् विश्रान्त आस्ते तत् ब्रह्म इह सत्यस्य सत्यं निगदितम् '—हे सत्य ज्याचा आश्रय करून रहाते, त्या ब्रह्माला शास्त्रांत सत्याचेंहि सत्य, असे म्हटले आहे.—' किंच यद्वत् अतःपर आधिक ( वा ) अन्यत् सत्यस्य सत्य नाम नास्ति '— शिवाय याच्यासारखे किंवा याच्याहून अधिक व श्रेष्ठ असे ' सत्याचे सत्य ' या नांवाचे दुसरे काहीं नाही.—' सच्च त्यच्च इति मूर्ताद्युपहितं अवर सत्य ( ब्रह्म तु ) अस्य अपि सत्यम् '—सत् व त्यत् या नावाच्या व्यक्त व अव्यक्त भूतानीं ज्याचा आश्रय केला आहे तें शबल ब्रह्म सत्य आहे; पण शुद्ध ब्रह्म त्याचेंहि सत्य होय. [ भगवान् आचार्य ब्रह्मच ' सत्य ' या शब्दाला पात्र आहे, असे येथे सांगतात—भूत, भविष्यत् व वर्तमान या तिन्ही कालीं ज्याचा बाध होत नाहीं, अशा ह्या प्राणादि अव्यक्त जगाला सत्य असे व्यवहारांत म्हणतात. पण हें प्राणादि जगत् ज्याच्या आधाराने राहते, त्या ब्रह्माला आत्मानुभवी पण्डित सत्याचें सत्य म्हणतात. ह्या ब्रह्मासारखें किंवा याहून अधिक असें सत्याचे सत्य दुसरें कांहींहि नाहीं. कारण तसे जर काहीं असते तर त्याचा सर्वप्रकाशक वेदांत अवश्य कोठे तरी उल्लेख असता. पण तसा उल्लेख कोठेंहि नाहीं. अर्थात् ब्रह्मच सत्य आहे. या श्लोकाच्या चतुर्थ चरणांत सत्यशब्दाची व्युत्पत्ति सांगितली आहे. सत् म्हणजे पृथ्वी, आप् व तेज हीं साकार भूतें व त्यत् म्ह० वायु व आकाश हीं निराकार भूते, ज्याच्या आश्रयानें राहतात, त्या शबळ ब्रह्माला सत्य असें म्हणतांत; पण शुद्ध ब्रह्म या सत्यांचेंहि सत्य आहे. ] ९६.

**यत्किंचिद्भात्यसत्यं व्यवहृतिविषये रौप्यसर्पाम्बुमुख्यं**
**तद्वै सत्याश्रयेणेत्ययमिह नियमः सावधिर्लोकसिद्धः।**
**तद्वत्सत्यस्य सत्ये जगदखिलमिदं ब्रह्मणि प्राविरासी-**
**न्मिथ्याभूतं प्रतीतं भवति खलु यतस्तच्च सत्यं वदन्ति ॥**

**अन्वयार्थ**—'यत् किंचित् रौप्यसर्पाम्बुमुख्य व्यवहृतिविषये असत्यं भाति तत् वै सत्याश्रयेण इति अय सावधिः नियमः लोकसिद्धः ( दृष्टः ) '—व्यवहारांतील दृश्य पदार्थांमध्ये जे काहीं रुपे, सर्प, मृगजल इत्यादि असत्य भासतें तें सर्वहि सत्याच्या आश्रयानें असते, असा हा अवधियुक्त ( साधिष्ठान ) नियम लोकसिद्ध आहे.—' तद्वत् सत्यस्य सत्ये ब्रह्मणि इदं अखिल जगत् प्राविरासीत् ' —त्याचप्रमाणे सत्याचेहि सत्य असे जे ब्रह्म, त्याच्या आधारावर हें सर्व जगत् व्यक्त होते—' मिथ्याभूत च यत' प्रतीत भवति तत् खलु सत्य वदन्ति '—आणि मिथ्याभूत सर्वहि पदार्थांचा ज्याच्या योगाने प्रत्यय येतो, तेच सत्य असे लोक म्हणतात. [ आता या श्लोकामध्ये पूर्णब्रह्माचे प्रतिपादन करितात—शिंपीच्या ठिकाणी रुपे, रज्जूच्या ठिकाणी सर्प व मरुभूमीवर मृगजल इत्यादि जेवढे म्हणून पदार्थ भ्रमाने भासतात, तेवढे सर्वहि शुक्ति, रज्जु, भूमि इत्यादि सत्य पदार्थांच्या आश्रयाने भासतात. रौप्यादिक भ्रम शुक्तिका, रज्जु इत्यादि व्यवहारातील सत्य पदार्थांच्या आश्रयाने होतात. कारण शुक्ति इत्यादिक अधिष्ठान नसेल तर ते भ्रम होणेच संभवनीय नाहीं. साराश ह्या व्यवहारामध्येसुद्धां प्रत्येक भ्रम साधिष्ठान असतो म्ह० त्याचे अधिष्ठान सत्य असते; असा हा सावधि नियम सिद्ध झाला. सावधि म्हणजे अवधिसह. हे रजत नसून शुक्तिका आहे, असें ज्ञान होईपर्यंत जो अवधि, त्या अवधीने युक्त असा हा भ्रम असतो. किंवा अवधि म्हणजे सीमा असा अर्थ घेतल्यास, शुक्तिकेसारख्या सत्य वस्तूच्या ज्ञानापर्यंत भ्रमाची मर्यादा असते. म्हणजे सत्य अशा अधिष्ठानाचे ज्ञान होतांच भ्रमाच्या अस्तित्वाचा लोप होतो, तस्मात् असत्य सत्याश्रयाने असतें हा सावधि नियम सर्वलोकसिद्ध आहे. तात्पर्य, अधिष्ठानाचे ज्ञान होईपर्यंत सर्व भास सत्य वाटतात; पण अशा भ्रामक सत्याचेहि सत्य जें ब्रह्म त्याच्या आश्रयानें हें सर्व जगत् व्यक्त झाले आहे. असे हे सत्यत्वाने भासणारें जगत् सावधि असल्यामुळें खरें नसून भ्रामक आहे. भ्रमांतील वस्तु ज्याच्या सत्तेमुळें प्रतीतीला येतात तेंच खरोखर सत्य, असें शास्त्रज्ञ म्हणतात. ] ९७.

यत्राकाशावकाशः कलयति च कलामात्रतां यत्र कालो
यत्रैवाशावसानं बृहदिह हि विराट् पूर्वमर्वागिवास्ते ।
सूत्रं यत्राविरासीन्महदपि महतस्तद्धि पूर्णाच्च पूर्णम्
संपूर्णादर्णवादेरपि भवति यथा पूर्णमेकार्णवाम्भः ॥ ५८ ॥

**अन्वयार्थ**—' यथा संपूर्णात् अर्णवादेः अपि एकार्णवाम्भः पूर्ण भवति '—ज्याप्रमाणे उदकाने परिपूर्ण असणाऱ्या समुद्रादिकांपेक्षा सातहि समुद्रांचे एकत्र झालेले पाणी अधिक पूर्ण असतें–' ( तथा ) यत्र आकाशावकाशः यत्र च कालः कलामात्रतां कलयति '–त्याचप्रमाणे ज्याठिकाणी आकाश रहातें, जेथें हा अगणित काल एका कलेसारखा भासतो,–' यत्र एव आशावसानं इह हि बृहत् विराट् पूर्व अर्वाक् इव आस्ते'–जेथे दहा दिशांनाहि राहण्यास जागा मिळते आणि जेथे हे स्थूल विराट्ब्रह्मसुद्धा अर्वाचीन असल्यासारखे असते व–. ' यत्र महत. अपि महत् सूत्र आविरासीत् तत् हि पूर्णात् पूर्ण '–जेथे विराडात्म्यापेक्षां अति मोठा असा सूत्रात्मा प्रकट होतो, ते ब्रह्म निःसंशय पूर्णाहून पूर्ण आहे. [ आचार्य ह्या श्लोकामध्ये " पूर्णमदः पूर्णमिदं....अवशिष्यते" ( बृ. उ. स. पृ० ७०९ ) या श्रुतीत प्रतिपादन केल्याप्रमाणे ब्रह्म पूर्णाहून पूर्ण आहे, असे सांगतात—ज्याप्रमाणे उदकाने तुडुंब भरलेल्या एका समुद्रापेक्षां अथवा नदीपेक्षां सप्त समुद्रांचे ऐक्य झाले असता त्यांचे उदक अधिक पूर्ण असते, त्याप्रमाणे ज्यामध्ये आकाशालाहि जागा मिळते, जेथे सृष्टीच्या आरंभापासून सृष्टीच्या अंतापर्यंतचा अगणित काल एका क्षणासारखा भासतो, ज्यामध्ये दहाहि दिशांचा अनायासे अंतर्भाव होतो, विराट्संज्ञक स्थूलसमष्टीचा अभिमानी वैश्वानरहि ज्याच्यामुळे अर्वाचीनसा ठरतो, तसेच ज्याठिकाणीं ह्या विराडापेक्षांहि मोठा ( विराडाचे कारण ) हिरण्यगर्भ ( सूक्ष्मसमष्टि ) व्यक्त झाला, ते शुद्ध ब्रह्म सर्व पूर्णापेक्षा पूर्ण आहे. आकाशादि कांहीं भूतें सर्वव्यापी असल्यामुळें पूर्ण असतात. पण हे ब्रह्म त्याहूनहि पूर्ण म्हणजे निरतिशय पूर्ण आहे. ] ५८.

अन्तः सर्वौषधीनां पृथगमितरसैर्गन्धवीर्यैर्विपाकै-
रेकं पाथोदपाथः परिणमति यथा तद्वदेवान्तरात्मा ।

**नानाभूतस्वभावैर्वहति वसुमती येन विश्वं पयोदो**
**वर्षत्युच्चैर्हुताशः पचति दहति वा येन सर्वान्तरोऽसौ ॥५९**

**अन्वयार्थ**—'यथा एकं पाथोदपाथः सर्वौषधीनां अन्तः आमितरसैः गन्धवीर्यैः विपाकैः पृथक् परिणमति '—एकच मेघोदक अनेक औषधींमध्ये अनेक रस, अनेक गंध, निरनिराळी शक्ति व पृथक् पाक इत्यादि निरनिराळ्या प्रकारांनीं परिणत होतें (म्हणजे एक व उदक निरनिराळ्या वनस्पतींमध्ये गेले असतां जसें निरनिराळ्या गुणधर्मांनीं युक्त होते )–' तद्वत् एव अन्तरात्मा '— त्याप्रमाणेंच हा एकच अंतरात्मा ( परिणाम पावतो. ) ' येन वसुमती नानाभूतस्वभावैः वहति'–हीं पृथ्वी ज्याच्यामुळे नानाप्रकारच्या भूतस्वभावांनीं व्यवहारयुक्त होते,–' ( येन ) पयोदः विश्वं उच्चैः वर्षति '–ज्यामुळे मेघ पृथ्वीवर जलाचा मोठा वर्षाव करितो व–' येन हुताशः पचति दहति वा ( सः ) असौ सर्वान्तरः ( अस्ति ) '–ज्याच्यामुळे अग्नि पाक व दाह करितो, तोच हा सर्वांच्या अंतर्यामीं रहाणारा परमात्मा होय. [ ब्रह्मच सर्व सृष्ट पदार्थांमध्ये ओतप्रोत भरून राहिले आहे, असे " यः पृथिव्यां तिष्ठन् " इत्यादि बृहदारण्यकाच्या तिसऱ्या अध्यायांतील सातव्या खंडामध्ये ( बृ. भा. पृ. १७७ ) सांगितले आहे व आचार्यांनीं तीच गोष्ट या श्लोकामध्ये मेघोदकाच्या दृष्टान्तानें स्पष्ट केली आहे. जसें एकच उदक नाना उपाधींच्या संसर्गाने नानाप्रकारचे रस, रूप, गंध इत्यादिकांनीं युक्त होते, तसेच अनेक उपाधींच्या योगानें एकच ब्रह्म अनेक प्रकारानीं भासते. ] ५९.

**भूतेष्वात्मानमात्मन्यनुगतमखिलं भूतजातं प्रपश्ये-**
**त्प्रायः पाथस्तरङ्गान्वयवदथ चिरं सर्वमात्मैव पश्येत् ।**
**एकं ब्रह्माद्वितीयं श्रुतिशिरसि मतं नेह नानास्ति किंचि-**
**न्मृत्योराप्नोति मृत्युं स इह जगदिदं यस्तु नानेव पश्येत् ॥**

**अन्वयार्थ**—' भूतेषु आत्मानं आत्मनि च अखिलं भूतजातं पाथस्तरंगान्वयवत् अनुगतं प्रायः प्रपश्येत् '—अनेक भूतांमध्यें एक आत्मा व एका आत्म्याचे ठिकाणीं, जल आणि त्याचे तरंग यांच्या संबंधाप्रमाणें, हें समग्र भूतजात ओतप्रोत भरलेलें आहे, असें पहावें.–' ब्रह्म एकं अद्वितीयं ( च ) श्रुतिशिरसि मतं ( अतः ) अथ चिरं सर्वं आत्मा एव पश्येत् '–ब्रह्म अद्वितीय

तर तो हीं कर्मे मी अमुक अमुक देवतेच्या प्रीत्यर्थ करीत आहें, अशी दृढ वासना ठेवितो. नित्य, काम्य, नैमित्तिक, प्रायश्चित्त, उपासना व प्रतिषिद्ध अशीं सहा प्रकारचीं कर्मे आहेत. ज्यांचें अनुष्ठान न केल्यास दोष लागतो अशीं संध्यावंदनादि हीं नित्य, स्वर्गादि इष्ट फलांचीं साधनें जीं ज्योतिष्टोमादि तीं काम्य, पुत्रजन्मादि निमित्तानें होणारीं जीं जातेष्टयादि कर्मे तीं नैमित्तिक, पापक्षय करणारीं प्रायश्चित्त, देवतांची आराधना ही उपासना व हिंसादिक हीं निषिद्ध कर्मे होत. त्यांतील नित्यादि चार कर्मांचे बुद्धिशुद्धि व उपासनेचे चित्तैकाग्र्य हे मुख्य फल आहे. नित्य, नैमित्तिक व उपासना यांचे पितृलोकप्राप्ति हें अवांतर ( दुसरें, गौण ) फल आहे. ' विविदिषन्ति यज्ञेन० ' व ' कर्मणा पितृलोकः ' ह्या श्रुति व 'तपसा किल्बिष हन्ति' ही स्मृति याला प्रमाण आहे. आतां अन्य देवतांना उद्देशून केलेलीं कर्मे ब्रह्माला कशीं अर्पण होतात, ह्याविषयीं एक दृष्टान्त देऊन, असें होणें सयुक्तिक आहे, हे सुचवितात--वृक्षाच्या मुळात पाणी घातले असता त्यांच्या तृप्तीनें जसा वृक्ष तृप्त होतो त्याप्रमाणें अन्य देवतांना उद्देशून जरी कर्म केलें तरी त्याने अवयवीभूत ( सर्व देवतारूप ) परमेश्वरच तृप्त होतो. म्ह० नासिका, नेत्र, इत्यादि अवयव तृप्त झाले असतां त्या सर्वांचा समूह जो अवयवी देही तोच तृप्त होतो. | ८९.

**यः प्रैत्यात्मानभिज्ञः श्रुतिविदपि तथा कर्मकृत्कर्मणोऽस्य**
**नाशः स्यादल्पभोगात्पुनरवतरणे दुःखभोगो महीयान् ।**
**आत्माभिज्ञस्य लिप्सोरपि भवति महाञ्शाश्वतः सिद्धिभोगो**
**ह्यात्मा तस्मादुपास्यः खलु तदधिगमे सर्वसौख्यान्यलिप्सोः॥**

**अन्वयार्थ**—' यः श्रुतिविद् अपि तथा कर्मकृत् आत्मानभिज्ञः ( सन् ) प्रैति अस्य कर्मणः अल्पभोगात् नाशः स्यात् '—जो वेदवेत्ता व तसेंच कर्मठ पुरुषहि आत्म्याविषयीं अज्ञ राहूनच परलोकीं जातो त्याच्या कर्मांचा ( स्वर्गांत ) कांहीं काल भोग मिळाला असतां नाश होतो–( अस्य ) पुनः अवतरणे महीयान् दुःखभोगः ( भवति ) '–( व त्याला ) पुनः या लोकीं जन्म घेतांना अत्यत दुःख होतें.–' आत्माभिज्ञस्य लिप्सोः अपि महान् शाश्वतः सिद्धिभोगः भवति '– आत्मज्ञानी असून जो कर्मफलाची इच्छा करितो त्यालाहि श्रेष्ठ व नित्य असे अणिमादि सिद्धींचे भोग मिळतात.–'अलिप्सोः तदधिगमे खलु सर्वसौख्यानि भवन्ति '–फलाच्या इच्छेनें कर्मे न करणाऱ्या पुरुषाला आत्मज्ञान झालें असतां

खरोखर सर्व सुखें प्राप्त होतात.–' तस्मात् आत्मा हि उपास्यः '—म्हणून आत्म्याचीच उपासना करणें योग्य आहे. [ ज्ञानरहित कर्म व ज्ञानसहित कर्म यांची फलव्यवस्था दाखवून सर्व सुखांच्या प्राप्तीकरितां आत्मज्ञान करून घेणेंच योग्य आहे, असे येथें सांगतात—एखादा पुरुष मोठा वेदवेत्ता व मोठा कर्मठहि असून आत्मज्ञानी नसला तर त्याला स्वर्गलोकीं गेल्यावर कांहीं काल भोग भोगिल्याने कर्मक्षय झाला असता पुनः या लोकीं येऊन जन्म घ्यावा लागतो. पण त्यावेळीं त्याला अत्यन्त दुःख होतें. भगवानांनी ' क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति '—त्या विशाल स्वर्गलोकांतील भोग भोगल्यानें कर्मे नष्ट झालीं असतां ते मृत्युलोकीं पुन जन्म घेतात, असे सांगितले आहे. ( गी. भा. पृ. ७०१ ) कर्मक्षयामुळें स्वर्गलोकातून भ्रष्ट होऊन मर्त्यलोकीं जन्म घेतांना प्राण्यांना अत्यंत दु:ख होतें. कारण देहधारण व देहविसर्जन अतिकष्टकर आहे. शिवाय व्यवहारात सुद्धा उच्च स्थितींतल्या पुरुषाला अवनति ( हीनावस्था प्राप्त ) झाली असता किती दु:ख होतें, हे सर्वांना ठाऊक आहेच. आत्मज्ञानी असून जो कर्मफलाची इच्छा करितो त्याला स्वर्गाहून श्रेष्ठ व पुष्कळ काल रहाणाऱ्या अणिमादि अष्ट सिद्धि प्राप्त होतात. तसेच कोणत्याच फलाची इच्छा न करणाऱ्या परोक्ष आत्मज्ञानी पुरुषाला साक्षात् आत्मज्ञान झाले असता सर्व सुखें ( परमानद ) प्राप्त होतात. ' अथ यो हवा अस्मात् ..कामयते तत्तत्सृजते ' ही श्रुति या श्लोकोक्त प्रतिपादनाला आधार आहे. ] ८६.

सूर्याद्यैरर्थभानं न हि भवति पुनः केवलैर्नात्र चित्रं
सूर्यात्सूर्यप्रतीतिर्न भवति सहसा नापि चन्द्रस्य चन्द्रात्।
अग्नेरग्नेश्च किन्तु स्फुरति रविमुखं चक्षुषश्चित्प्रयुक्ता-
दात्मज्योतिस्ततोऽयं पुरुष इह महो देवतानां च चित्रम्॥

अन्वयार्थ—' सूर्याद्यैः केवलैः पुनः अर्थभानं न हि भवति इति अत्र न चित्रं '—केवल सूर्यादिकांच्या योगाने विषयज्ञान होत नाहीं, पण यांत कांहीं आश्चर्य नाहीं,–'सूर्यात् सूर्यप्रतीतिः सहसा न भवति अपि च चन्द्रस्य चन्द्रात् अग्नेः अग्नेः च न ( प्रतीतिः ) '—सूर्यामुळे सूर्यप्रतीति कधींच होत नाही. तसेंच चंद्रामुळें चंद्राची व अग्नीमुळे अग्नीचीहि प्रतीति होत नाहीं –' किन्तु चित्प्रयुक्तात् चक्षुषः रविमुखं स्फुरति '–तर चैतन्यप्रयुक्त नेत्रांच्या योगानें

सूर्यादिक भासतात.—'ततः अयं पुरुषः आत्मज्योतिः इह देवतानां च चित्रं महः अस्ति '—यास्तव हा पुरुषच स्वयंज्योति व विषयभोगकालीं ( चक्षुरादि ) देवतांचें विचित्र तेज आहे. [ चंद्रसूर्यादि ज्योति स्वतंत्रपणे विषय प्रकाशित करण्यास समर्थ नाहींत, असे येथे सांगतात—केवळ सूर्यादि ज्योतींच्या योगाने विषयांचे ज्ञान होत नाहीं, असे जे पूर्वी निरूपण केले तेच खरे आहे. त्यांत अपूर्व असे कांहीं नाहीं. सूर्यादि देवता आपापल्या विषयांचे ज्ञानें करून देतात, असे जे लोक समजात ते मात्र चमत्कारिक आहे. कारण सूर्यामुळे सूर्य, चद्रामुळें चंद्र किंवा अग्नीमुळे अग्नि कधींच प्रतीत होत नाहीं, तर चैतन्ययुक्त नेत्रानीं त्या सर्वांची प्रतीति येते. ( ते सर्व दिसतात. ) कारण जात्यन्ध अथवा निद्रित पुरुषाला त्याची प्रतीति कधींच येत नाहीं, हे सर्व प्रसिद्ध आहे. यास्तव हा आत्मा जाग्रतीत व स्वप्नातहि आत्मज्योति ( स्वप्रकाशरूप, अन्यप्रकाशनिरपेक्ष ) आहे व इंद्रियव्यापारकालीं चक्षुरादिकाच्या रूपरसादि परस्परविलक्षण विषयाना प्रकाशित करणारे तेज आहे याविषयीं ' चित्रं देवानामुदगात्० ' ही श्रुति प्रमाण आहे. ] ८७.

**प्राणेनाम्भांसि भूयः पिबति पुनरसावन्नमश्नाति तत्र**
**तत्पाकं जाठरोऽग्निस्तदुपहितबलो द्राक् शनैर्वा करोति ।**
**व्यानः सर्वाङ्गनाडीष्वथ नयति रसं प्राणसंतर्पणार्थम्**
**निःसारं पूतिगन्धं त्यजति बहिरयं देहतोऽपानसंज्ञः ॥ ८८**

**अन्वयार्थ**—' असौ प्राणेन अम्भांसि भूयः पिबति पुन. अन्नं च अश्नाति' – हा आत्मा प्राणद्वारा वारवार पाणी पितो व पुन पुनः अन्न खातो. '–तत्र तदुपहितबलः जाठरः अग्निः द्राक् शनैः वा तत्पाकं करोति–' अन्नादि भक्षण केल्यावर प्राणांच्या साह्याने ( श्वासद्वारा ) बलयुक्त झालेला जठराग्नि शीघ्र किंवा हळुहळू त्या अन्नादिकांचें पचन करितो.– ' अथ व्यानः प्राणसंतर्पणार्थं सर्वाङ्गनाडीषु रसं नयति अय अपानसंज्ञ निःसारं पूतिगन्ध बहिः त्यजति– ' व्यान प्राणाना तृप्त करण्याकरिता सर्व नाड्यामध्ये ( त्यांतील ) रस नेतो ( आणि ) हा अपाननांवाचा वायु ( अन्नोदकांचा ) निःसार व घाण भाग मूत्र व विष्ठारूपानें शरीरांतून बाहेर टाकितो. [ या श्लोकांत क्रमाने प्राण, व्यान व अपान हे तीन वायु शरीरांत काय करितात, हे सांगितले आहे. आत्मा प्राणाच्या योगानें अन्न खातो व उदक पितो. म्ह० क्षुधा व तृषा हे

प्राणाचे धर्म असून त्यांच्या शांतीकरितां भक्षणादि क्रिया तोच करितो. पण त्यांपासून भोक्त्याला दुःख व तृप्ति होते. हे भोग त्याला प्राणाच्या द्वारांच प्राप्त होतात, असे सुचविण्याकरितां प्रथम चरणांत ' आत्मा प्राणद्वारां खातो ' इत्यादि ह्मटले आहे. प्राण श्वासोच्छ्वास करून जठराग्नीला प्रदीप्त करितो. तो जशी जलद किंवा मंद श्वसनक्रिया करील तसा तो अग्नि खाल्लेल्या अन्नादिकांचे शीघ्र किंवा हळुहळू पचन करितो. नंतर त्या पक्क अन्नोदकांतील सार व्यान सर्व शरीरांतील सर्व नाड्यांना पोचवितो व त्यामुळे प्राणाची तृप्ति होऊन त्यांना पुनः सतत क्रिया करण्याचे सामर्थ्य येते. येथे प्राणशब्दानें इंद्रियेंहि घ्यावीं. कारण त्यांनाहि आपापले कर्म करण्याची शक्ति या सारभूत अन्नरसामुळेच येते. ह्याप्रमाणे पक्क अन्नोदकांतील सार व्यानानें घेतले असतां त्यांचा अवशिष्ट राहिलेला निःसार घाण भाग अपान वायु, मूत्र व विष्ठा या रूपानें देहाबाहेर टाकितो. ] ८८.

**व्यापारं देहसंस्थः प्रतिवपुरखिलं पञ्चवृत्त्यात्मकोऽसौ**
**प्राणः सर्वेन्द्रियाणामधिपतिरनिशं सत्तया निर्विवादम् ।**
**यस्येत्थं चिद्धनस्य स्फुटमिह कुरुते सोऽस्मि सर्वस्य साक्षी**
**प्राणस्य प्राण एषोऽप्यखिलतनुभृतां चक्षुषश्चक्षुरेषः ॥८९**

**अन्वयार्थ**—' अनिशं यस्य चिद्धनस्य सत्तया इह पञ्चवृत्त्यात्मकः देहसंस्थः सर्वेन्द्रियाणां अधिपतिः असौ प्राणः इत्थं प्रतिवपुः निर्विवादं अखिलं व्यापारं स्फुटं कुरुते '—सर्वदा ज्या चिद्रूप परमात्म्याच्या सत्तेनें या शरीरांत पांच वृत्तींनीं युक्त असणारा, देहांत राहणारा व सर्व इंद्रियांचा अधिपति असा हा प्राण ह्याप्रमाणें प्रत्येक शरीरांत निःसंशय सर्व व्यापार स्पष्टपणें करितो;–' सः सर्वस्य साक्षी ( अहं ) अस्मि '—तो सर्वसाक्षीच (मी) आहे. —'अखिलतनुभृतां प्राणस्य प्राणः एषः चक्षुषः चक्षुः अपि एषः '—सर्व देहधाऱ्यांच्या प्राणाचा प्राण हाच व सर्वांच्या नेत्रांचाहि नेत्र हाच आहे. [ ह्याप्रमाणें पूर्व श्लोकांत प्राणादिकांचे कर्म सांगून आतां सर्ववृत्तिसमूहरूप जो मुख्य प्राण त्याला सत्ता व प्रकाश देऊन त्याचा साक्षी होणारा जो सच्चिदानंदरूप आत्मा त्याचे विवेचन करण्याकरितां येथे लक्षण सांगतात —केवळ चैतन्यरूप आत्म्याच्या सत्तेनें ( अस्तित्वानें ) सद्रूप व पूर्वोक्त प्राणनादि पांच वृत्तींनीं युक्त होऊन हा मुख्य प्राणवायु या व्यष्टि व समष्टि

देहांत रहातो. तो समष्टिरूपानें उपास्य व व्यष्टिरूपानें उपासक होतो. तोच समष्टि व व्यष्टि देहांतील इंद्रियांचा ( ज्ञान-कर्मसाधनांचा ) स्वामी आहे. कारण त्याच्यावांचून कोणत्याच इंद्रियाची प्रवृत्ति होत नाहीं. असा तो हा प्राण जीवरूपानें प्रत्येक शरीरामध्ये अगदीं स्पष्टपणे सर्व व्यवहार करितो. ह्याप्रमाणें सर्वांना सत्ता ( अस्तित्व ) व प्रकाश ( ज्ञानशक्ति ) देऊन त्यांच्याकडून व्यवहार करवीत असल्यामुळे तो सर्व कार्यांचे निमित्त व उपादान कारण आहे. त्यामुळेच असा हा सर्वांचा साक्षी ( प्रत्यक्ष प्रकाशक ) जो आत्मा तोच मी आहे. ह्याविषयीं प्रमाणभूत श्रुतीच्या एकदेशाचा श्लोकांतच निर्देश करितात. हा प्रत्यगात्मा सर्व व्यापाराला कारण होणाऱ्या वायूचेंहि कारण व तसेच सर्वांच्या ज्ञानशक्तीचेंहि बीज आहे. ] ८९

यं भान्तं चिद्घनैकं क्षितिजलपवनादित्यचन्द्रादयो ये
भासा तस्यैव चानु प्रविरलगतयो भान्ति तस्मिन्वसन्ति ।
विद्युत्पुंजोऽग्निसंघोऽप्युडुगणविततिर्भासयेत्किं परेशं
ज्योतिः शान्तं ह्यनन्तं कविमजममरं शाश्वतं जन्मशून्यम् ॥

**अन्वयार्थ**—'ये प्रविरलगतय. क्षितिजलपवनादित्यचन्द्रादय.'–जे स्वरूपत: अगदीं भिन्न असणारे पृथ्वी, जल, वायु, सूर्य, चद्र इत्यादि पदार्थ–'ते य चिद्घनैक भान्तं सन्तं तस्य भासा एव च अनुभान्ति च तास्मिन् वसन्ति'–ते ज्या चैतन्यपूर्ण, एक व प्रकाशरूप असणाऱ्या आत्म्याच्या स्वप्रकाशामागून प्रकाशित होतात व ज्याच्यामध्येच रहातात,–' तं शान्त ज्योतिः अनन्त कवि अज अमरं हि शाश्वत जन्मशून्यं परेश '–त्या शान्त, प्रकाशरूप, अंतरहित, सर्वज्ञ, जन्मरहित, अमर, म्हणूनच नित्य व जन्मशून्य अशा परमेश्वराला–' विद्युत्पुंजः अग्निसंघः अपि उडुगणविततिः भासयेत् किं '–वीज, अग्निसमूह किंवा तारागण प्रकाशित करील काय ? ( कधींहि नाहीं. ) [ ' सर्वप्रकाशकत्व ' हे ब्रह्माचे लक्षण सांगून, स्थूणानिखनन–( खुंटा हालवून हालवून घट्ट करणे या ) न्यायाने पुनः तेंच दृढ करून आतां ' न तत्र सूर्यो भाति० ' ( काठकभा. पृ. १३२ ) या प्रमाणभूत श्रुतीच्या आधाराने पुनः तेंच येथें निश्चित करितात—पृथ्व्यादि प्रत्येक तत्त्वाचें स्वरूप भिन्न-भिन्न असल्यामुळे त्यांचा अगदीं पृथक् रीतीनें व्यवहार होतो. तीं सर्व तत्त्वें जरी प्राण्याला प्रकाशरूप दिसतात, तरी तो त्यांच्या अंगचा प्रकाश नसतो. तर तीं सर्वेहि सच्चिदानंदघन, दुसऱ्या प्रकाशाची

अपेक्षा न धरितां स्वरूपानेच प्रकाशित होणारा, एक व सर्वांना प्रकाश देऊन व्यवहारपटु करणारा जो परमात्मा त्याच्या प्रकाशानें प्रकाशित होतात. शिवाय तीं सर्व तत्त्वे त्याच्या सत्तेनेंच ( अस्तित्वानेंच ) सत्तावान् होतात व आपापले व्यवहार करितात. सारांश—सर्व जगाचे कारण, वासनाशून्य, नाशरहित, सर्व शास्त्रांचें बीज असल्यामुळे सर्वज्ञ, नित्य अविकारी असल्यामुळें जन्मशून्य व मरणशून्य अशा त्या आत्म्याला लोकांना प्रकाशमय दिसणारा विजेचा गोळा, अग्नि, नक्षत्रमाला किंवा चंद्र-सूर्यादि तरी प्रकाशित करतील काय? छेः! कधींच नाही. कारण सत्तारूप आत्म्यावांचून कधींच कोणाची स्थिति होणे संभवनीय नाहीं. शिवाय व्यवहारात सुद्धां एक प्रकाश दुसऱ्या प्रकाशाला प्रकाशित करीत नाहीं, असाच अनुभव आहे. या श्लोकांत यास्कमुनिपठित ‘ जायते, अस्ति० ’ इत्यादि म्ह० जन्म घेतो, जीवंत असतो, वाढतो, यौवनावस्थापन्न होतो, वृद्ध होतो व मरतो या सहा भावविक्रियांचा ‘ अज० ’ इत्यादि पदांनी निषेध केला आहे. ] ९०.

**तद्ब्रह्मैवाहमस्मीत्यनुभव उदितो यस्य कस्यापि चेद्वै**
**पुंसः श्रीसद्गुरूणामतुलितकरुणापूर्णपीयूषदृष्ट्या ।**
**जीवन्मुक्तः स एव भ्रमविधुरमना निर्गतेऽनाद्युपाधौ**
**नित्यानन्दैकधाम प्रविशति परमं नष्टसंदेहवृत्तिः ॥९१॥**

**अन्वयार्थ**—‘ यस्य कस्य अपि पुंसः श्रीसद्गुरूणां अतुलितकरुणापूर्णपीयूष-दृष्ट्या तद्ब्रह्म एव अहं अस्मि इति अनुभवः उदितः चेत् ’—कोणाहि एखाद्या पुरुषाला. श्रीसद्गुरूंच्या अप्रतिम करुणेने पूर्ण अशा अमृत दृष्टीने ‘ ते ब्रह्मच मी आहे ’ असा अनुभव जर आला तर—‘ भ्रमविधुरमनाः ( अत एव ) नष्टसंदेहवृत्तिः ( सन् ) जीवन्मुक्तः ( भवति ) ’—त्याचें मन भ्रमरहित होते, ( त्यामुळेच त्याचे ) सर्व संशय नष्ट होतात व तो जीवन्मुक्त (होतो)—‘ स एव अनाद्युपाधौ निर्गते सति परमं नित्यानन्दैकधाम प्रविशति’—आणि तोच त्याची अनादि उपाधि नष्ट झाली असता श्रेष्ठ व नित्य आनंद हेच ज्याचे रूप आहे अशा आत्म्यामध्ये प्रवेश करितो. [ मागच्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे प्रकाशरूप आत्म्याचा अनुभव आला असतां जीवन्मुक्ति हे फल मिळते, असें येथें सांगतात—कोणाहि अधिकारी पुरुषाला श्रीगुरूंच्या निरुपम करुणेनें भरल्यामुळें अमृततुल्य ( मरणाची निवृत्ति करणाऱ्या ) दृष्टीनें प्राप्त झालेल्या

ब्रह्मविद्येच्या योगानें ' मी ब्रह्म आहे ' असा अनुभव आला असतां ( म्ह० गुरूंनीं सांगितलेल्या लक्षणाचें, देश, काल, वस्तु इत्यादिकांनीं होणाऱ्या परिच्छेदाने रहित व महावाक्यस्थ ' तत्'-पदाचे लक्ष्य ब्रह्मच मी—त्वंपद-लक्ष्य कूटस्थ आहे, त्याहून भिन्न नाही, असा निश्चयात्मक साक्षात्कार झाला असतां ) तेव्हाच त्या पुरुषाचे मन विपरीतज्ञानरहित होते. ( म्ह० प्रारब्धा-प्रमाणे जीवन्मुक्त्यवस्थेमध्ये व्यवहार करण्यास योग्य असे ते होते. ) अंतः-करण भ्रमशून्य झाल्यामुळेच त्याच्या सशययुक्त वृत्ति नाहीशा होतात. असे झाले असता पुरुष ( साधक ) जीवन्मुक्त होतो. ' स एव ' या पदांनी त्या जीवन्मुक्तालाच विदेहमुक्ति हें फल मिळते, असे सांगतात. तो जीवन्मुक्तच प्रारब्ध कर्मांचा क्षय झाला असतां व मायारूपी उपाधि समूळ नष्ट झाली असतां, पुनर्जन्माचे बीज अशीं जी सचितादि कर्में ती पूर्वी आत्मज्ञानकालीच नष्ट झाल्यामुळे, कार्यकारणभावशून्य ( म्ह० निरुपाधिक ) व निरतिशय आनंदरूप अशा मुख्य गृहामध्ये ( स्वरूपांत—तेजामध्ये ) प्रवेश करितो. धाम म्ह० तेज किंवा गृह असे जे स्वतःचे रूप ते सर्व सूर्यादि तेजांना प्रकाशित करिते, म्हणून तेज व आब्रह्मस्तम्बपर्यंत सर्वांचे तें वसतिस्थान असल्यामुळें गृह होय. अशा त्या तेजांत किंवा गृहांत ( म्ह० स्वतःच्या रूपांत ) तो लीन ( तद्रूप ) होतो. ह्या श्लोकाच्या प्रथम चरणात ' यस्य कस्यापि ' ही पदे योजून व्यवहारसिद्ध मनुष्य, पशु इत्यादि जाति, ब्राह्मणादि वर्ण, ब्रह्मचर्यादि आश्रम, बाल्यादि वयोवस्था, स्त्री, पुरुष, उच्च, नीच इत्यादि भेद शास्त्रीय ज्ञानाला प्रतिबंध करीत नाहीत, असे सुचविले आहे. लोक भ्रमाने काहींना मोक्षाचा अधिकार आहे व कांहींना नाहीं, असें मानतात. पण अमुक अमुक लक्षणानीं युक्त असलेला कोणीहि पुरुष मोक्षाचा अधिकारी आहे, असे प्रतिपादन करणाऱ्या वाक्यांनी त्यांचे निराकरण केले आहे. ' पुंस ' असे पद श्लोकांत योजून मोक्षाचे मुख्य साधन जे तत्त्वज्ञान तें प्राप्त होण्याकरितां गुरुशुश्रूषा व तद्द्वारा श्रवणादिसाधने यांचे अनुष्ठान मुमुक्षूनें प्रयत्नपूर्वक करावे, असें सुचविले आहे. ' श्रीसद्गुरूणा ' म्ह० मुक्ति व श्री ( सपत्ति ) यासहवर्तमान असणारे व तद्रूप ब्रह्माचा ज्यांना साक्षात्कार झाला आहे, अशा उपदेशक गुरूचा. आत्मज्ञानी गुरु श्रीयुक्त असतात, याविषयी ' भद्रैषां लक्ष्मीर्निहिता-धिवाचि ' अस्ति ब्रह्मेति चेद्वेद० ' इत्यादि अनेक श्रुति प्रमाण आहेत. ] ९१.

**नो देहो नेन्द्रियाणि क्षरमतिचपलं नो मनो नैव बुद्धिः**
**प्राणो नैवाहमस्मीत्यखिलजडमिदं वस्तुजातं कथं स्याम् ।**

नाहंकारो न दारागृहसुतसुजनक्षेत्रवित्तादि दूरं
साक्षी चित्प्रत्यगात्मा निखिलजगदधिष्ठानभूतः शिवोऽहम्॥

अन्वयार्थ—' अहं देहः नो इन्द्रियाणि न क्षर अतिचपलं मनः च नो बुद्धिः न एव प्राणः न एव अस्मि '—मी देह नव्हे, इंद्रिये नव्हे, क्षयि व अत्यंत चपल असे मन नव्हे, बुद्धिहि नव्हे, प्राणहि नव्हे,—'इति इदं अखिलजडं वस्तुजात कथं स्याम् '—मग मी हे सर्व जड वस्तुजात कसे असेन ?—' अहंकारः न दारागृहसुतसुजनक्षेत्रवित्तादि दूरं न ( अस्मि )'—मी अहंकार नव्हे; (देहापासून) दूर ( निराळी ) असणारी स्त्री, गृह, पुत्र, बांधव, शेत, द्रव्य, इत्यादिहि मी नव्हे—' साक्षी चित्प्रत्यगात्मा निखिलजगदधिष्ठानभूतः शिवः अहं अस्मि '—तर मी साक्षी ज्ञानरूप, सर्वान्तर्यामी व सर्व जगाला आधार देणारा शिव आहें. [ आतां येथे त्याच ज्ञान्याच्या प्रारब्ध कर्मांचा क्षय होईतो, व्यवहाराला प्रतिबंध न होता जीवन्मुक्तीचे सुखहि त्याला घेता यावे, म्हणून देहादि सर्वांविषयीं सर्वदा दृढ असत्त्वभावना ठेवून त्याने स्वतःच्या आत्मस्वरूपाचें अनुसंधान ठेवावे, असे सांगतात—पंचीकृत पंचभूतांचे कार्य व अन्नाचा विकार असा हा स्थूल देह मी नव्हे. कारण मी सच्चिद्रूप आहे व देह क्षय पावणारा व प्रतिक्षणीं निरनिराळया रूपाचा होणारा म्ह० विकारी आहे; पण आत्मा सद्रूप असल्यामुळे स्थिर व चिद्रूप आहे, असा सूक्ष्मदृष्टि पुरुषाला अनुभव येतो. अर्थात् त्या उभयतामध्ये अगदीं वैलक्षण्य ( अंतर ) असल्यामुळे मी देह नव्हे, तसेच मी ( आत्मा ) क्रियेची व ज्ञानाचीं साधनें जी इंद्रिये तींहि नव्हें. तीं परस्पर पृथक् असल्यामुळे असत्त्वरूप आहेत, हे उघडच आहे. शिवाय विषयाच्या असत्त्वानेच त्याचे असत्त्व प्रतीतीला येत असल्यामुळे व तीं चंचल असल्यामुळे मी नव्हे. इंद्रिये आत्मा नव्हे, असे सिद्ध करण्याकरितां पूर्व विशेषणे येथेंहि घ्यावी. मी संशयात्मक मन नव्हे. काम, क्रोध इत्यादि वृत्तींनी युक्त असल्यामुळे मन विकारि आहे, असें सिद्ध होते व ते असद्रूप असल्यामुळे वस्तुतः नाहींच. पण मी मनोविकाराची उत्पत्ति व नाश यांना प्रकाशित करितो व सच्चिद्रूपानें प्रकाशमान आहे, म्हणून मी मन नव्हें. निश्चयात्मक अंतःकरणवृत्तिहि मी नव्हे, कारण ती बुद्धि जाग्रदादि अवस्थांमध्ये उत्पन्न होते व सुषुप्तींत लय पावते व मी आत्मा तर तिन्ही अवस्था व जाग्रत्-स्वप्नांतील बुद्धि याचा साक्षी व सद्रूप आहे, म्हणून मी बुद्धि नव्हें. शिवाय शरीरांतील प्राणापानादि पांच वृत्तींनीं युक्त असलेला प्राणवायु मी

नव्हे. हे सर्वहि देहादि जड ( चैतन्यशून्य ) पदार्थजात माझें प्रकाश्य ( मजकडून प्रकाशित—ज्ञात—होणारें, माझ्यामुळे अस्तित्वांत येणारे ) आहे व मी विकृतिशून्य सच्चिदानदरूप आहे. तेव्हा आम्हां उभयतांचे ऐक्य कसें होणार ? त्यामुळेच मी अहंकारहि नव्हें. कारण अहंकाराला विषय होणारे सर्व पदार्थ दृश्य जड, निस्तत्त्वरूप व विकारी असल्यामुळे अहकारहि निस्तत्त्वादि धर्मयुक्तच आहे. अर्थात् माझ्यापेक्षां पृथक् आहे. अगदी निकट असणारा देह व देहधर्मसुद्धां जर मी नव्हें तर स्त्री, गृह, पुत्र, आप्त, इष्ट, बाधव, क्षेत्र ( शेत ), द्रव्य इत्यादि मजपासून धडधडीत निराळे असणारे पदार्थ मी कसा असेन ? मी ह्या देहादि जड पदार्थांना साक्षात् प्रकाशित करितो ( जाणतो ) म्हणून मी त्याचा साक्षी आहे. ज्ञानरूप असल्यामुळे मी चित् ( चैतन्य ), बुद्ध्यादि सर्वांच्याहि आंत असून स्वयज्योति असल्यामुळे मी प्रत्यक्, सर्वांचा स्वत:मध्ये लय करीत असल्यामुळे व सद्रूप असल्यामुळे मी आत्मा व ज्याच्यावांचून सर्गभ्रमाला अधिष्ठान होणाऱ्या शबल ब्रह्माचीहि सिद्धि होत नाही तो गौणरीतीने सर्व जगाचे अधिष्ठान होणारा मी ( आत्मा ) कल्याणरूप आहे. ] ९२.

**दृश्यं यद्रूपमेतद्भवति च विशदं नीलपीताद्यनेकं**
**सर्वस्यैतस्य दृग्वै स्फुरदनुभवता लोचनं चैकरूपम् ।**
**तद्दृश्यं मानसं दृक् परिणतविषयाकारधीवृत्तयोऽपि**
**दृश्या दृग्रूप एव प्रभुरिह स तथा दृश्यते नैव साक्षी ॥९३**

**अन्वयार्थ**—' दृश्यं यत् एतत् नीलपीताद्यनेक च रूप विशद भवति '—दृश्य ( नेत्राचा विषय ) असे हे जे निळे, पिवळे इत्यादि अनेक प्रकारचे रूप स्पष्ट भासते—' सर्वस्य एतस्य दृक् वै स्फुरदनुभवता तच्च लोचन एकरूपम् '—त्या सर्वांचे दर्शनसाधन प्रतीतीला येणारा अनुभवपणाच आहे. तोच नेत्र आहे व तो एकरूपच असतो.—' तत् दृश्य मानस दृक् ( तस्य धीः दृक् ) परिणतविषयाकारधीवृत्तय: अपि दृश्या. '— पण तोहि दृश्य ( अनुभवविषय ) आहे. त्याचे दर्शनसाधन मन आहे. ( मनाचा प्रत्यय बुद्धीला येतो. ) विषयाकारानें परिणाम पावलेल्या ( त्याच्यासारख्या आकाराच्या ) बुद्धिवृत्तीसुद्धां दृश्य आहेत.—' ( किंतु ) इह प्रभुः साक्षी दृग्रूपः एव '—( पण ) या सर्व जडसमूहांत सर्वांचा नियामक व साक्षी असा जो आत्मा तोच ज्ञानरूप आहे—' स तथा नैव दृश्यते '— विषयांप्रमाणें त्याचा अनुभव कोणालाच येत नाहीं. [ पूर्व श्लोकांत

जीवन्मुक्त पुरुष आत्मानुसंधान कसे ठेवितो तें सांगितलें आतां येथे तेच पुनः निराळ्या प्रकारानें सांगतात—हें प्रत्यक्ष अनुभवाला येणारें रूप निळें, काळें, पांढरे, पिंवळे, इत्यादि अनेक प्रकारांनीं भासत असल्यामुळें दृश्य ( अनुभवाला योग्य ) आहे. ह्या प्रतीत होणाऱ्या सर्व रूपांचें ग्रहण करणारी व जिच्यामध्ये अनुभवरूप स्फुरणे भासतात, अशी दृष्टिच नेत्र होत. कारण ते नेत्र रूपदर्शनाचे साधन आहेत. पण त्यांची प्रतीति एकरूपानेच येते म्ह० रूपामध्ये जसे नीलादि अनेक भेद दिसतात तसे नेत्रांत कोठेच दिसत नाहींत. ते नेत्रहि दृश्य आहेत. कारण नेत्रांचा मनाला अनुभव येतो. त्या मनाला निश्चयरूप अंतःकरण ( बुद्धि ) पाहते ( विषय करिते. ) ती बुद्धिहि दृश्य आहे. कारण विषयरूप झालेल्या अंतःकरणवृत्तींचाहि भोक्त्याला अनुभव येत असतो. म्हणून भोक्त्याच्या अनुभवाला येणारे हें सर्व पदार्थजात जड व विकारी असल्यामुळें आत्म्याहून पृथक् आहे, असा निश्चय करावा. ह्या जड पदार्थांत गूढ राहून सर्वांचाहि अनुभव घेणारा प्रभु व सर्वांच्या निकट राहून त्याना साक्षात् पाहणारा साक्षी आत्माच ज्ञानरूप आहे. सर्व पदार्थांना जरी हा आपल्या ज्ञानसामर्थ्यानें प्रकाशित ( व्यवहारयोग्य ) करितो व सर्वांचा अनुभव घेतो, तरी याला प्रकाशित करणारा व याचा अनुभव घेणारा दुसरा कोणीहि नाही. तात्पर्य—विषयांचा अनुभव नेत्रादि इंद्रिये, नेत्रांचा मन, मनाचा बुद्धि व बुद्धीचा अनुभव आत्मा घेतो; पण त्याचा अनुभव घेणारा दुसरा कोणीहि प्रतीत होत नाही. म्हणून हाच स्वप्रकाश, स्वयंज्योति, अनुभवरूप व ज्ञान ( ज्ञेय नव्हे ) आहे. साराश व्यवहारांत आम्ही सर्व प्राकृत लोक बुद्धिस्थ संस्कारानाच ‘ ज्ञान ’ म्हणून म्हणतो. पण ते खरें ज्ञान नसून ज्ञेय आहे. कारण त्याचाहि अनुभव दुसरा कोणी घेत असतोच, पण आम्हा विषयी जनाना ते समजत नाही.] ९३.

रज्ज्वज्ञानाद्भुजङ्गस्तदुपरि सहसा भाति मन्दान्धकारे
स्वात्माज्ञानात्तथासौ भृशमसुखमभूदात्मनो जीवभावः ।
आप्तोक्त्याहिभ्रमान्ते स च खलु विदिता रज्जुरेका तथाहं
कूटस्थो नैव जीवो निजगुरुवचसा साक्षिभूतः शिवोऽहम् ॥

**अन्वयार्थ**—‘ ( यथा ) मन्दान्धकारे रज्ज्वज्ञानात् तदुपरि सहसा भुजङ्गः भाति ’–ज्याप्रमाणे मंद अंधकारामध्ये दोरीचे ज्ञान न झाल्यामुळे तिच्या ठिकाणीं सर्प भासतो,–‘ तथा स्वात्माज्ञानात् असौ आत्मनः जीवभावः भृशं

अमुखं ( भाति ) '–तसाच स्वात्म्याच्या अज्ञानानें आत्म्याचा जीवभाव अत्यंत दुःखरूप (भासतो)–' ( यथा ) आप्तोक्त्या अहिभ्रमान्ते सः च खलु विदिता एका रज्जुः एव अभूत् '–आप्ताच्या सांगण्यावरून सर्पभ्रम निवृत्त झाला असतां जसा तो ज्ञात झालेली ती एक रज्जुच होतो,–' तथा निजगुरुवचसा ( जीवत्वभ्रमान्ते ) अहं जीवः न एव अस्मि '–तसाच आपल्या गुरूच्या वचनानें ( जीवत्वभ्रम नष्ट झाला असता ) मी जीव नव्हेच तर–' अहं साक्षिभूतः कूटस्थः शिवः अस्मि '–मी सर्वसाक्षी, निर्विकार व कल्याणरूप आहे. ( असा बोध होतो. ) [ आतां येथें त्या जीवन्मुक्ताचे स्वरूप सांगतात व साधकाने गुरूंवर विश्वास ठेवून, त्यांनीं सांगितलेल्या वचनानुरूप तर्क करून, युक्तीने स्वतःच्या जीवत्वाचा बाध करून आत्मानुसंधान कसे करावे, हेंहि सांगतात. जसे— अति अंधकारहि नाहीं व प्रकाशहि नाहीं, अशा वेळीं रस्त्यांत पडलेल्या दोरीचे यथार्थ ज्ञान न झाल्याने म्ह० तिच्या स्वरूपाच्या अज्ञानाने पहाणाराला तो मोठा सर्प आहे, असे एकाएकीं वाटतें, तसेच स्वतःच्या आत्म्याचें यथार्थ स्वरूप न समजल्याने म्हणजे आत्म्याचे आत्मरूप यथार्थ ज्ञात न झाल्यामुळे त्याच्याच ठिकाणीं हा सर्व प्राकृतांच्या प्रत्ययाला येणारा आत्मसंबंधी अत्यंत दुःखरूप जीवभाव भासतो. सर्पभ्रमाला रज्जूचे ज्ञान न होणे हे कारण असून तीच जशी त्याला आधार असते तसेच जीवत्वभ्रमाला आत्म्याचे अज्ञान कारण व तोच आधार आहे. पण ज्याच्यावर आपला विश्वास असतो, अशा एखाद्या पुरुषाने ' अरे तो सर्प नव्हे, दोरी आहे ' असे सांगितले असता व त्याप्रमाणे आपणाला अनुभव आला असता जसा सर्पभ्रम नष्ट होतो व पूर्वी भासलेला सर्पच केवळ एक दोरी होऊन राहतो म्ह० दोरीचें ज्ञान झाल्याने तद्विषयक अज्ञान व अज्ञानकार्य नष्ट होते व रज्जुरूपाने ज्ञात झालेली एकटी रज्जुच अवशिष्ट राहते, त्याप्रमाणे स्वगुरूच्या ( आत्मज्ञानोपदेशकाच्या ) वचनाने म्ह० त्यानीं सांगितलेल्या ' तत्त्वमसि ' इत्यादि वाक्याच्या अर्थद्वारा व युक्तीने जीवत्वभ्रम नष्ट झाला असता, सुख, दुःख, जन्म, मरण, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि धर्मांनी युक्त होणारा जीव मी नव्हे, तर मी जीवादिकांचा साक्षात् अनुभव घेणारा आहे. त्यामुळेच आत्मज्ञानी मला साक्षी म्हणतात. पण वस्तुतः मी निर्विकार व कल्याणरूप आहे, असे आत्मानुसंधान जीवन्मुक्त पुरुषाने सर्वदा ठेवावे. सारांश—सर्पभ्रम जसा आप्तोपदेशाने नष्ट होतो, तसाच जीवत्वभ्रमहि गुरूपदेश, शास्त्रवचन, तदनुसार तर्क व स्वतःचा अनुभव यांच्या योगाने निःशेष घालवून सर्वदा आत्मस्वरूपचिंतनांत अवशिष्ट आयुष्य घालवावे. ] ९४.

किं ज्योतिस्ते वदस्वाहनि रविरिह मे चन्द्रदीपादि रात्रौ
स्यादेवं भानुदीपादिकपरिकलने किं तव ज्योतिरस्ति।
चक्षुस्तन्मीलने किं भवति च सुतरां धीर्धियः किं प्रकाशे
तत्रैवाहं ततस्त्वं तदसि परमकं ज्योतिरस्मि प्रभोऽहम्॥

अन्वयार्थ—'ते कि ज्योतिः वदस्व'—प्रश्न-हे शिष्या, तू कोणत्या तेजाने (प्रकाशाने) व्यवहार करितोस ते सांग.—'इह अहनि मे रविः रात्रौ चन्द्रदीपादि स्यात्—' उत्तर—या व्यवहारांत दिवसा सूर्य व रात्रीं चद्र, दीप इत्यादि माझी तेजे आहेत.—'एव भानुदीपादिकपरिकलने तव कि ज्योतिः अस्ति'—प्रश्न-ठीक आहे. पण सूर्य, दीप इत्यादिकाचे ग्रहण तू कोणत्या ज्योतीने करितोस?—'चक्षु'—उत्तर-नेत्राने.—'तन्मीलने च कि भवति'—प्रश्न-आणि नेत्र मिटल्यावर कोणत्या तेजाने व्यवहार करितोस?—'सुतरां धीः'—उत्तर-सर्वथा सर्वप्रकाशक बुद्धीने.—'धियः प्रकाशे कि (अह)'—प्रश्न-बुद्धीचा प्रकाशक कोण? उ०-(मी अहकार.)—'तत्र एव कि अहं'—प्रश्न-तुझा प्रकाशक कोण? उत्तर-मी शुद्ध चिद्घन आत्मा.—'ततः त्व तत् असि'—गुरु-तस्मात् तू ते आहेस.—'हे प्रभो अहं परमक ज्योतिः अस्मि'—शिष्य-हे प्रभो, मी सर्वश्रेष्ठ तेज आहे. [ आचार्य आता येथे तोच जीवन्मुक्त स्वतःच्या अतःकरणांत गुरुशिष्याची कल्पना करून त्यांच्या सवादद्वारा परम ज्योतीरूप आत्म्याकडे अनुसधान कसे ठेवितो, ते सांगतात—गुरु प्रश्न करितात—हे शिष्या, दिवसा जो तू सर्व पदार्थांशीं व्यवहार करितोस व रात्रीहि जो तुझा दिवसाप्रमाणेच व्यवहार होतो तो कोणत्या प्रकाशाने ते मला सांग. शिष्य-महाराज दिवसा सूर्यप्रकाशाने व रात्री चद्र, दीप इत्यादिकाच्या प्रकाशाने मी व्यवहार करितो. गु०-त्या चद्रसूर्यादि वस्तुप्रकाशक वस्तूचे ज्ञान तरी तुला कसे होते? शिष्य-महाराज, मी माझ्या नेत्रांनीं त्यांचे ग्रहण करितो व माझे नेत्र त्या प्रकाशाच्या साहाय्याने सर्व पदार्थ पहातात. गु०-पण तू जेव्हा नेत्र मिटतोस तेव्हां, किंवा निद्रेमध्ये तुझे डोळे जेव्हां आपोआप मिटतात तेव्हा सूर्यादि प्रकाशक व घटादि प्रकाश्य यांचा अनुभव घेणारे कोणतें तेज असते? शि०-नेत्र मिटले असतां अत्यन्त प्रकाशक जी बुद्धि तिच्या योगाने माझा सर्व व्यवहार होतो. गु०-बरे, बुद्धीचा प्रकाशक कोण? कारण चद्र-सूर्याप्रमाणेंच तीहि प्रकाशमय आहे, असा अनु-

भव येत असतो; तर तिचा अनुभव घेणारा कोण ? शि०-मी ( अहंकार ), कारण मी बुद्धीच्या सर्व चेष्टा जाणतो. ( ह्याप्रमाणें शिष्यानें गुरूंना उत्तर दिले असतां पुन: ) गुरु म्हणतात—पण त्या अनुभवाला येणाऱ्या अहंतेचा व्यवहार तूं कोणत्या ज्योतीनें करितोस ? ( असा प्रश्न केला असता शिष्याला स्वस्वरूपाहून अन्य तेज न दिसल्यामुळे पुनः अहंकाराला प्रकाशित करणारा मीच ( आत्मा ) आहे, असे त्यानें सांगितले. हे ऐकून ) गुरु म्हणतात—तर मग तुझ्याहून अन्य दुसरा कोणताच पदार्थ खरोखर प्रकाशरूप नसल्यामुळे व जे सूर्यादि व्यावहारिक प्रकाशरूप पदार्थ आहेत तेहि त्या आत्म्याला, तो स्वयंज्योति व म्हणूनच प्रकाशरूप असल्यामुळे, प्रकाशित करूं शकत नाहीत, म्हणून ती श्रेष्ठ ज्योतिच ( म्ह० कार्य-कारण, प्रकाश्य-प्रकाशक इत्यादि व्यावहारिक भावाशी यत्किंचितूहि संबंध न ठेवणारे तेज ) तू ('त्व'पदाचा लक्ष्यार्थ आत्मा ) आहेस. असा कृपाळु गुरूंनीं उपदेश केला असतां, शिष्य त्याविषयी स्वतःशी एकान्तांत विचार करून स्वतःचा अनुभव सांगतो—हे प्रभो, मीच ती श्रेष्ठ ज्योति आहे. याच अर्थी ' आत्मैवास्य ज्योतिः० ' इत्यादि बृहदारण्यकश्रुति प्रमाण आहे. ( बृ. भा. अ. ४ ब्रा. ३ पृ. ४१–५० ) येथे आचार्यांनीं गुरुशिष्यसंवादरूपानें विचाराची दिशा फार मार्मिकपणे, श्रुतीच्या आधारानें, दाखविली आहे. ] ९५.

**कंचित्कालं स्थितः कौ पुनरिह भजते नैव देहादिसंघं**
**यावत्प्रारब्धभोगं कथमपि स सुखं चेष्टतेऽसङ्गबुद्ध्या ।**
**निर्द्वन्द्वो नित्यशुद्धो विगलितममताहंकृतिर्नित्यतृप्तो**
**ब्रह्मानन्दस्वरूपः स्थिरमतिरचलो निर्गताशेषमोहः ॥ ९६**

**अन्वयार्थ**—' कंचित्कालं कौ स्थितः इह पुन: देहादिसंघं न एव भजते'—( तो ) काहीं कालपर्यंत पृथ्वीवर राहिला तरी पुन: येथे देहादिसमूहावर आस्था ठेवीत नाहीं.—' यावत्प्रारब्धभोगं कथमपि असङ्गबुद्ध्या सः निर्द्वन्द्वः नित्यशुद्धः विगलितममताहंकृतिः नित्यतृप्तः ब्रह्मानंदस्वरूपः स्थिरमतिः अचलः निर्गताशेषमोहः (सन्) सुखं चेष्टते '—(तर) प्रारब्धकर्मभोग संपेपर्यंत कसा तरी निःसंग ब्रह्मच आत्मा आहे, अशा ज्ञानानें सुख-दुःखादि द्वंद्वरहित, सर्वदा शुद्ध, ज्याची अहंता व ममता नष्ट झाली आहे, ज्याची बुद्धि स्थिर आहे, जो अचल आहे व ज्याचा सर्व मोह नष्ट झाला आहे, असा तो जीवन्मुक्त

पुरुष मोठ्या आनंदाने व्यवहार करितो. [ आतां या श्लोकांत आचार्य, पूर्वी सांगितल्याप्रमाणे ज्याला अनुभव आला आहे, असा जीवमुक्त जगांत कसा व्यवहार करितो ते सांगतात—कांहीं कालपर्यंत ( म्ह० प्रारब्ध कर्माचा क्षय होईतो ) तो ब्रह्मवेत्ता पुरुष या पृथ्वीमध्ये रहात असल्यासारखा वाटतो. ‘कु’ म्ह० पृथ्वी असा जरी रूढ अर्थ आहे तरी या ठिकाणीं ‘कु’ म्ह० अंतःकरण असा अर्थ करणे योग्य आहे. कारण ब्रह्मदेव, वसिष्ठ इत्यादि आत्मज्ञानी सिद्ध, अन्य लोकांमध्ये रहातात, असे पुष्कळ ठिकाणी सांगितलेले आहे. म्हणून ‘ कु ’ या शब्दाचा क्षेत्र ( अंतःकरण ) असा व्यापक अर्थ करावा. सारांश, अंतःकरणात तो पुरुष रहात असल्यासारखा वाटतो खरा, पण तो तेथें राहूनहि स्थूल देह, स्त्री, पुत्र, मित्र इत्यादि विषयसमूहाचे ठिकाणीं आस्था ठेवीत नाहीं. कारण देहादि पदार्थ निस्तत्त्व आहेत, अशी त्याची दृढ समजूत झालेली असते व त्यामुळे ते सत्य आहेत किंवा आत्म्याचा व त्यांचा कांहीं संबंध आहे, असें तो मुळीच मानीत नाही. तो या स्थूल-सूक्ष्म देहामध्ये प्रारब्ध कर्माचा क्षय होईतो आनंदाने रहातो. ब्रह्मवेत्ता स्वतः ईश्वर असल्यामुळे तो वस्तुतः माया व प्राक्तन यांच्या अधीन झालेला नसतो. पण त्याच्या अधीन झाल्यावाचून कर्तृत्व, भोक्तृत्व, सिद्ध होत नाही. म्हणून तो प्रारब्धकर्मलयापर्यंत देहात यदृच्छेने रहातो. तात्पर्य—भोक्तृत्वादिकांची अन्य तऱ्हेने उपपत्तिच लागत नसल्यामुळे व देवादिकांच्या ठिकाणीहि कर्तृत्वादि दिसत असल्यामुळे ब्रह्मवेत्त्याचा व्यवहारहि अनिर्वचनीय आहे, असेच म्हटले पाहिजे आणि हे सुचविण्याकरिताच ‘ कथमपि ’ असे श्लोकात म्हटलें आहे. तो जीवन्मुक्त ‘ माझा आत्मा कोठेहि आसक्त न होणारा आहे ’ अशा सतत भावनेने मोठ्या आनंदाने व्यवहार करीत रहातो. कारण त्याचे आत्मविषयक सर्व संशय नष्ट झालेले असतात. त्याला असंगबोध कसा होतो व त्याचा परिणाम त्याच्यावर कसा घडतो हे पुढच्या अर्धातील विशेषणांनी स्पष्ट करितात—‘ निर्द्वंद्व ’ म्ह० तो नित्यशुद्ध असल्यामुळे सुख-दुःख, शीतोष्ण इत्यादि द्वंद्वरहित होतो. ‘ नित्यशुद्ध ’-जीव पाप-पुण्यवान् असल्यामुळे त्याला सर्वदा शुद्ध रहातां येत नाहीं, तर पापामुळे तो बहुतेक सर्वदा अशुद्धच असतो आणि पुण्यामुळे केव्हा केव्हा शुद्ध होतो. पण आत्मज्ञानी पुरुष ब्रह्मच होत असल्यामुळे त्रिकालींहि पाप-पुण्यहीन असतो, म्हणून तो नित्यशुद्ध होय. तो नित्यशुद्ध असतो म्हणूनच त्याचा देहेंद्रियादिकांविषयीं अहंकार व देहाहून पृथक् असणाऱ्या पुत्रादिकांविषयीं ममता हीं नष्ट होतात.

अहं-ममभाव नष्ट झाल्यामुळें तो सर्वदा तृप्त असतो. त्याच्या तृप्तीला कधींच प्रतिबंध होत नाहीं. कारण तो अपरिमित आनंदरूप होतो. त्याची बुद्धि ब्रह्माच्या ठिकाणीं स्थिर होते व तो स्वतः ब्रह्मरूप होत असल्यामुळे अचल होतो. कारण त्याचा मोह मूल अविद्यारूप कारणांसह नष्ट झालेला असतो. तात्पर्य—जीवन्मुक्त व्यवहार करीत असल्यासारखा जो सर्वांना प्रत्यय येतो, तो मायिक आहे, खरा नव्हे. कारण तो पुरुष मायामय देहादिकांनीं जरी व्यवहार करीत असला तरी अंतःकरणांत आत्मस्वरूपाविषयी सर्वदा सावधान असतो. ] ९६.

**जीवात्मब्रह्मभेदं दलयति सहसा यत् प्रकाशैकरूपं**
**विज्ञानं तच्च बुद्धौ समुदितमतुलं यस्य पुंसः पवित्रम् ।**
**माया तेनैव तस्य क्षयमुपगमिता संसृतेः कारणं या**
**नष्टा सा कार्यकर्त्री पुनरपि भविता नैव विज्ञानमात्रात् ९७**

**अन्वयार्थ**—'प्रकाशैकरूप यत् विज्ञान सहसा जीवात्मब्रह्मभेद दलयति'— प्रकाश हेच ज्याचे मुख्य रूप आहे, असे ज्ञान तत्क्षणींच जीव, आत्मा व ब्रह्म यातील भेद घालवितें —'तत् च पवित्र अतुल यस्य पुसः बुद्धौ समुदितं (अभूत्)'— व ते पवित्र आणि निरुपम ज्ञान ज्या पुरुषाच्या बुद्धींत उत्पन्न होते —'तस्य ससृतेः कारण या माया'— त्याची ससाराला कारण होणारी जी माया, '— सा तेन एव क्षयं उपगमिता' — ती त्या ज्ञानानेच क्षय पावते. (तरी तिचे भान असते.)—'विज्ञानमात्रात् सा नष्टा पुनरपि कार्यकर्त्री न एव भविता'—पण केवळ ज्ञानानेच, नष्ट झालेली ती माया पुनः भ्रम हे कार्य करणारी होत नाहीं, जीवत्वभ्रम उत्पन्न करीत नाहीं. [आचार्य ज्ञानी पुरुष जरी क्रिया करीत असल्यासारखा वाटतो, तरी त्याची ती क्रिया अज्ञानी पुरुषाच्या क्रियेप्रमाणे सुखदुःखादि ससार उत्पन्न करीत नाहीं, असे येथे सकारण प्रतिपादन करितात—आत्मज्ञान वेदांतील महावाक्यापासून उत्पन्न होत असते. पण त्यांच्या अर्थाचा बोध गुरुमुखाने करून घेतला पाहिजे व गुरूपदेशानतर स्वतः युक्तिप्रयुक्तीने तोच वाक्यार्थ सत्य आहे, अशाविषयीं आपला दृढ निश्चय केला पाहिजे. ह्या निश्चित ज्ञानाला 'चरमवृत्ति' म्ह० शेवटची बुद्धिवृत्ति, असे म्हणतात. कारण 'मी ब्रह्म आहे' अशी एकदा वृत्ति झाली कीं तो पुरुष अतःकरणवृत्तिशून्य होत असतो. ज्याचें प्रकाश (अनुभव—

साक्षात्कार) हे मुख्य रूप आहे, असें हे ज्ञान उत्पन्न होतांच ते जीव—त्वंपद-लक्ष्य कूटस्थ आत्मा व तत्पदलक्ष्य ब्रह्म यांतील भेद तत्क्षणींच नष्ट करितें. तें राग, द्वेष इत्यादि दोषांच्या वासनांसह मनाचा सर्व मल घालवितें. म्हणून ते पवित्र व निरुपम आहे. असे श्रेष्ठ ज्ञान ज्या दृढ प्रयत्न करणाऱ्या उत्तम अधिकाऱ्याच्या शुद्ध अंतःकरणांत उत्पन्न होते, त्याच्या त्या ज्ञानाने संसारोत्पत्तीला कारण होणारी माया नष्ट होते. कारण मायेचा नाश करण्यास अन्य कोणत्याच साधनाची अपेक्षा नसते. कार्य-कारणभावरहित असल्यामुळे ती निस्तत्त्वरूप माया, प्रकृति या नांवाने शास्त्रांत प्रसिद्ध आहे. मूळ अज्ञान नष्ट झाले तरी तो ज्ञानी व्यवहार करीत असल्यासारखा भासतो, पण त्या केवळ भासानेच एकदा नष्ट झालेली माया पुनः कधींच भ्रमरूप कार्य करूं शकत नाहीं, ही गोष्ट अगदीं निश्चित आहे. ] ९७.

विश्वं नेति प्रमाणाद्विगलितजगदाकारभानस्त्यजेद्वै
पीत्वा यद्वत्फलाम्भस्त्यजति च सुतरां तत्फलं सौरभाढ्यम्।
सम्यक् सच्चिद्घनैकामृतसुखकवलास्वादपूर्णो हृदासौ
ज्ञात्वा निःसारमेवं जगदखिलमिदं स्वप्रभः शान्तचित्तः ॥

अन्वयार्थ—'यद्वत् फलाम्भः सुतरां पीत्वा तत् फल सौरभाढ्य वै त्यजति' —ज्याप्रमाणें आम्रादि फलांतील रस निःशेष पिऊन—चोखून ते फल उत्तम वासाने युक्त असले तरी ( प्राणी ) टाकितो,—' ( तद्वत् ) असौ विश्व न इति प्रमाणात् विगलितजगदाकारभानः'—(त्याचप्रमाणे) हा ( जीवन्मुक्त) 'विश्व नाहीं' ह्या प्रमाणवाक्याच्या योगाने ज्याचें जगद्रूपि भान नष्ट झाले आहे—'हृदा सम्यक् सच्चिद्घनैकामृतसुखकवलास्वादपूर्णः च (सन्)'—व जो सूक्ष्म दृष्टीनें चैतन्यपूर्ण, एक व नाशरहित अशा सुखाचा अनुभव घेऊन नित्यतृप्त झाला आहे,—'शान्तचित्तः स्वप्रभः एवं अखिलं इदं जगत् निःसारं ज्ञात्वा त्यजेत्'—अशा त्या शांतचित्त व स्वयंज्योति ज्ञानी पुरुषाने याप्रमाणे सर्व जगत् निःसार आहे, असे जाणून टाकावे. [ ज्ञानी पुरुष संसार करीत असल्यासारखा जरी दिसतो तरी त्याचा तो त्याग करितो. म्हणजे त्यांत आसक्त होत नाहीं, असें येथें दृष्टान्त देऊन सांगतात—हा ज्ञानी 'जगत् नाहीं' 'अन्य कांहीं नाहीं' असे प्रतिपादन करणाऱ्या स्वतःप्रमाण श्रुतिवाक्यांच्या दृढानुसंधानानें निःशंक होतो. त्यामुळें जगदाकाराप्रमाणें सर्वांच्या अंतःकरणांत असणारें जें जगद्रूप भान तें त्याच्या

ठिकाणीं नसते, तर तें कारणासह नष्ट होते. सर्वहि दृश्य पदार्थांचें परीक्षण करून प्रत्येक पदार्थाला उद्देशून 'हे नव्हे' 'हें नव्हे' असा सर्वांचा बाध केल्यामुळें अवशिष्ट रहाणारा जो चैतन्यपूर्ण, स्वगतादिभेदरहित व नाशहीन आनंद त्याचा तो ग्रास करितो. म्ह० त्या परमानंदाचा यथेच्छ अनुभव घेतो. मनुष्य अन्नाचे ग्रास जसे हाताने तोंडांत घालितो, तसाच हा त्या पूर्ण आनंदरूप अन्नाचे वैदिक सांख्य व योग ह्या हस्तानी अंतःकरणाच्या विद्यारूप मुखामध्ये ग्रास घेतो. जिव्हेने कांहीं काल रसास्वाद घेतला असतां प्राणी तृप्त होतो, तसा त्या आनंदानुभवाने हा ज्ञानी नित्यतृप्त होतो व हे सर्व जगत् असार आहे म्ह० यांत सत्त्व किंवा सुख नाहीं, असा त्याचा निश्चय होतो आणि असा निश्चय झाला असतां चित्तविक्षेपाचे कारणच नष्ट झाल्यामुळे त्याचे अंतःकरण शांत होतें. त्यामुळे भाजलेल्या बीजाप्रमाणे ते चित्त संसारोत्पत्तीच्या निरुपयोगी झाले असतां ज्ञान्याने ह्या जगाचा त्याग करावा. याविषयी एक लौकिक दृष्टान्त देतात—जसा व्यावहारिक पुरुष आंबा, नारिंग इत्यादि फलातील सर्व रस पिऊन अवशिष्ट राहिलेला नीरस भाग सुवासिक असला तरी, त्याला त्याची गरज नसल्यामुळे टाकून देतो, तसाच मुमुक्षूने ज्ञानानंतर हा संसार टाकावा. ] ९८.

क्षीयन्ते चास्य कर्माण्यपि खलु हृदयग्रन्थिरुद्भिद्यते वै
छिद्यन्ते संशया ये जनिमृतिफलदा दृष्टमात्रे परेशे ।
तस्मिंश्चिन्मात्ररूपे गुणमलरहिते तत्त्वमस्यादिलक्ष्ये
कूटस्थे प्रत्यगात्मन्यखिलविधिमनोऽगोचरे ब्रह्मणीशे ९९

अन्वयार्थ—' तस्मिन् चिन्मात्ररूपे गुणमलरहिते तत्त्वमस्यादिलक्ष्ये कूटस्थे प्रत्यगात्मनि अखिलविधिमनोऽगोचरे ब्रह्मणि ईशे परेशे दृष्टमात्रे सति '—त्या केवल चैतन्यरूप, सत्त्वादि गुणकृत मलाने रहित, तत्त्वमसि इत्यादि महावाक्यांचा लक्ष्यार्थ, निर्विकार, सर्वान्तर्यामी सर्व वैदिकविधि व मन यांना अगोचर, निरतिशय श्रेष्ठ व ईश अशा परमेश्वराचे दर्शन होतांच—' अस्य च कर्माणि क्षीयन्ते '—साधकाचीं सर्व कर्मे नष्ट होतात.—' खलु हृदयग्रन्थिः अपि उद्भिद्यते '—हृदयग्रंथि तेव्हांच तुटते व—' ये जनिमृतिफलदाः संशयाः ते छिद्यन्ते वै '—जन्ममरणरूप फल देणारे जे आत्मविषयक संशय तेहि नष्ट होतात. [ आतां येथें ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं ज्ञानानें मिथ्या ठरलेल्या अहं-

कारादि सृष्टीची प्रतीति येत असून जरी तो तद्द्वारा कर्मे करितो तरी त्यांच्यामुळें त्याला बंध उत्पन्न होत नाहीं, याविषयीं ' भिद्यते हृदयग्रन्थिः० ' इत्यादि मुंडकश्रुतीचें ( मु. भा. पृ. ७९ ) प्रमाण देतात. वेदान्तामध्यें सांगितलेल्या सर्व लक्षणांनीं ज्ञात होणारें केवल चैतन्यरूप ( म्ह० केवल विषयी, अहंकारादिकाप्रमाणें विषय नव्हे ) केवल ज्ञान ( ज्ञेय नव्हे ) व निर्विकार असे जे ब्रह्म, तद्रूप ज्याची अंतःकरणवृत्ति झाली आहे त्याला परमेश्वराचें दर्शन ( ज्ञान, साक्षात्कार ) झाले असता तत्क्षणींच त्याची सर्व संचित व क्रियमाण कर्में क्षीण होतात. ह्या ब्रह्मसाक्षात्कारवान् पुरुषाची हृदयस्थ चित् व जड यांचे ऐक्यरूप अज्ञानग्रंथि ( गांठ ) निःसशय सुटते. म्ह० अहंकारादि सर्व भाव जड आहेत व आत्माच एक चैतन्ययुक्त आहे असा निश्चय झाल्याने पुन. पूर्वीप्रमाणे तो भ्रमाने जड-चैतन्यांचे तादात्म्य करीत नाही. आतां असा ग्रंथिभेद होतोच म्हणून कशावरून, असे कोणी विचारतील म्हणून सांगतात—देहाहून आत्मा पृथक् आहे कीं ते दोघे एकच ? अशा तऱ्हेचे त्याचे सर्व सशय नष्ट होतात. कारण हे सशय त्या अज्ञानग्रंथीपासून उद्भवणारे असल्यामुळे अज्ञानग्रंथि नष्ट झाली असतां तिचे कार्य ( सशयहि ) नष्ट होते. हे आत्म्याविषयीचे सशयच पुन. पुन जन्ममरणरूप फल देत असतात. म्हणून सशय नष्ट झाले असता जन्ममरणपरंपराहि नाहीशी होते. साराश, ब्रह्मज्ञानानें सर्व अनर्थ टळतात. द्वितीयार्धांत अनेक विशेषणे योजून वेदान्तोक्त सर्व ब्रह्मलक्षणे सुचविलीं आहेत. रज व तम ह्या गुणापासून उत्पन्न होणारे रागद्वेषादि मल ज्याच्या ठिकाणी नाहीत, जो ' तत्त्वमसि ' ' अहं ब्रह्मास्मि ' ' सत्य ज्ञानमनन्त ब्रह्म ' ' प्रज्ञानघन एव ' ' प्रज्ञानं ब्रह्म ' इत्यादि महावाक्यानी केवळ जहदजहल्लक्षणेनेच लक्षित होतो; जो सर्वव्यापी आहे; माया व मायाकार्य अहंकारादि, याचा त्याच्यावाचून निर्वाहच होत नसल्यामुळे जो ईश ( नियन्ता ) आहे; जो वेदांतील कोणत्याच विधींनी प्रेरित न होणारा असून मनालाहि ज्याच्याविषयीं सकल्प करितां येत नाहीं; जो निर्विकार आहे; अतर्मुख शुद्ध वृत्तीने अज्ञानाचा नाश होतांच स्वतःच जो प्रकाशित होतो; व्यवहारामध्ये ब्रह्मादिकांचे व मायेचे नियमन करणारा असे ज्याला उगीच म्हणत असतात; म्ह० ज्याच्यावांचून त्यांचें किंवा त्यांच्या कार्यांचें अस्तित्वच सिद्ध होत नाहीं; तो परमेश होय. अशा त्या परमेशाचेंच दर्शन झालें असतां परमपुरुषार्थ प्राप्त होतो. ] ९९.

आदौ मध्ये तथान्ते जनिमृतिफलदं कर्ममूलं विशालं
ज्ञात्वा संसारवृक्षं भ्रममदमुदिताशोकतानेकपत्रम् ।
कामक्रोधादिशाखं सुतपशुवनिताकन्यकापक्षिसंघं
छित्त्वासङ्गासिनैनं पटुमतिरभितश्चिन्तयेद्वासुदेवम् ॥१००

अन्वयार्थ—' आदौ मध्ये तथा अन्ते ( असन्नपि ) जनिमृतिफलद '–उत्पत्तीपूर्वी, उत्पत्तीनंतर व तसेच नाशानतर ( असद्रूप असूनहि ) जन्ममरणरूप फल देणारा;–' कर्ममूलं '–कर्मापासून उत्पन्न होणारा,–' विशाल '–महान्–'भ्रममदमुदिताशोकतानेकपत्रं '–भ्रम, मद, हर्ष, शोक, इत्यादि अनेक पर्णांनीं युक्त असणारा;–' कामक्रोधादिशाख '–काम, क्रोध इत्यादि शाखांनी युक्त व–'सुत-पशु-वनिता-कन्यकापक्षिसघ ससारवृक्षं ज्ञात्वा '–पुत्र, पशु, स्त्री, कन्या, इत्यादि पक्षिसमुदाययुक्त असा हा ससारवृक्ष ( निस्तत्त्व आहे, असे ) जाणून–'एन असङ्गासिना छित्त्वा पटुमति अभितः वासुदेव चिन्तयेत् '–शहाण्या पुरुषानें त्याला असंग शस्त्राने तोडून सतत वासुदेवाचे चिंतन करावे. [आता अशा ज्ञान्याची ' ब्रह्मच आत्मा आहे ' अशी सतत वृत्ति ( शेवटची वासना उत्पन्न होईतो ती ) दृढ करण्यास्तव त्याने ध्यान व ध्यानापूर्वीहि अवश्य कर्तव्य कर्म करावे, असे येथे सांगतात—हा ससारवृक्ष तिन्ही काली खोटा असून जन्ममरणरूप फल देणारा आहे. प्राण्यांचे कर्म हेच त्याचे मूळ आहे. तो फार विस्तीर्ण आहे. विपरीत ज्ञान, मी श्रेष्ठ आहे असा गर्व, हर्षवृत्ति, खेदवृत्ति इत्यादि त्या वृक्षाचीं जणु काय अनेक पर्णे ( पाने ) आहेत. काम ( प्रिय विषयाविषयीं इच्छा ), क्रोध ( इच्छेला प्रतिबंध झाला असतां उत्पन्न होणारी रोषवृत्ति ), लोभ ( विषयसंरक्षणमति ) इत्यादि जशा काही त्याला शाखा (खांद्या) आहेत. पुत्र, गायी, बैल इत्यादि पशु, स्त्रिया, कन्या, हेच जणुकाय त्यावर राहणारे पक्षी आहेत. हा संसार ज्ञानानें नष्ट होत असल्यामुळे किंवा व्यवहारातहि तो क्षणिक असल्याचे सर्वांच्या प्रत्ययाला येत असल्यामुळे त्याला वृक्ष असे म्हटले आहे. ' ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख० ' ( काठ. भा. पृ. १३४ ) ही श्रुति व 'ऊर्ध्वमूलमधःशाखं०' ( गी. भा. पृ. १०१९ ) ' ह्या ससारवृक्षाचे मूळ वर–श्रेष्ठ असून शाखा खालीं–क्रमी प्रतीच्या आहेत ' ही स्मृति या रूपकाला प्रमाण आहे. अशा अश्वत्थ-( क्षणिक )संज्ञक ससारवृक्षाचें यथार्थ ज्ञान करून घेऊन मननादिकांच्या अनुष्ठानानें ज्याची बुद्धि सूक्ष्म झाली आहे, अशा मुमुक्षूने, मी

असंग आहें ( मी कोठेंच आसक्त होत नाहीं ) असा अनुभव, हेंच असंगशस्त्र घेऊन त्याच्या योगानें या वृक्षाचा छेद करावा (संसाराचा क्षय करावा) आणि नंतर सतत वासुदेवाचें चिंतन करावें. वासुदेव म्हणजे भगवान् गोपालकृष्ण. अथवा वा+असु+देवः म्हणजे 'वा' विकल्पानें, पर्यायानें; 'असूनां'—प्राण व इंद्रिये यांचा 'देवः'—प्रकाशक—सर्व प्राणेंद्रियांना प्रकाशित करणारा आत्मा असा अर्थ करावा. ] १००.

जातं मय्येव सर्वं पुनरपि मयि तत्संस्थितं चैव विश्वं
सर्वं मय्येव याति प्रविलयमिति तद्ब्रह्म चैवाहमस्मि ।
यस्य स्मृत्या च यज्ञाद्यखिलशुभविधौ सुप्रयातीह कार्यं
न्यूनं संपूर्णतां वै तमहमतिमुदैवाच्युतं सन्नतोऽस्मि १०१

अन्वयार्थ—'सर्वं मयि एव जातं पुनः अपि च तत् विश्वं मयि संस्थितं'—सर्व द्वैतजात माझ्या ठिकाणींच उत्पन्न झाले आहे आणि पुनः तें विश्व माझ्यामध्येंच स्थित आहे.—'तत् सर्वं मयि एव प्रविलयं याति'—तें सर्व माझ्यामध्येंच लीन होतें,—'इति च ब्रह्म एव अहं अस्मि'—यास्तव तें ब्रह्मच मी आहें—'च यस्य स्मृत्या यज्ञाद्यखिलशुभविधौ न्यूनं कार्यं वै संपूर्णतां सुप्रयाति'—शिवाय ज्याच्या स्मरणाने यज्ञादि सर्व शुभ कृत्यांत न्यून कर्महि निश्चयानें संपूर्ण होतें,—'तं अच्युतं एव अहं अतिमुदा सन्नतोऽस्मि'—त्या अच्युताला-( स्वाम्याला )च मोठया आनंदाने मी साष्टांग प्रणाम करितों. [ भगवान् आचार्य आतां ह्या शेवटच्या उपसंहारात्मक श्लोकांत 'सर्वांच्या उत्पत्ति-स्थिति-लयांचा आधार ब्रह्म आहे' असें स्वतःच्या आत्म्यामध्ये ब्रह्माचें अनुसंधान करावें म्ह० माझा आत्माच सर्वाधार ब्रह्म आहे, अशी सर्वदा चित्ताची भावना ठेवावी व स्वात्मज्ञान झालें असतांच सर्व कर्में समाप्त होतात, असे येथें स्पष्टपणे सांगून स्वात्म्याला नमस्कार करितात—हें सर्व द्वैतजात ब्रह्मरूप कूटस्थ जो मी आत्मा त्या माझ्यामध्यें ( माझ्या आधारानें ) उत्पन्न झालें आहे म्ह० ब्रह्म व आत्मा एक आहेत, असें मला ज्ञान झालें आहे. 'एव'शब्दाने येथें ब्रह्मीभूत आत्म्याहून सृष्टीला अन्य कोणीहि आधार नाहीं, असे सुचविलें आहे. याठिकाणीं उत्पन्न होणे म्ह० नामरूपानें व्यक्त होणे असा अर्थ आहे. उत्पत्तीनंतरहि हें सर्व जगत् माझ्या ( शबल—कारण ब्रह्माच्या ) आधारानें असतें आणि निद्रा व प्रलयकालींहि ते माझ्या मध्येंच लीन होते. प्रलयकालीं ते पुनरुत्पत्तीला

कारण होणाऱ्या संस्कारांसह लीन होत असल्यामुळें त्याला प्रविलय व मुक्तिकालीं आत्मज्ञानानें कारणासह द्वैताचा नाश होत असल्यामुळे त्याला मोक्ष असें म्हणतात. " यतो वा इमानि....तद्ब्रह्मेति " या तैत्तिरीयश्रुतिप्रतिपादितलक्षणयुक्त ब्रह्म, सृष्टीला तीन्हीं कालीं कारण होत असल्यामुळें तें तिचें उपादान कारण होय. तसेंच देश, काल, वस्तु इत्यादिकांच्या योगानें ज्याला किंचित्‌हि गौणत्व येत नाहीं, असें तें ब्रह्मच मी (महावाक्यस्थ 'अहं'पदाचा लक्ष्यार्थ ) आहें, म्हणून ज्या ब्रह्मरूप प्रत्यगात्म्याचें स्मरण केल्यानें यज्ञादि सर्व शुभविधींत एखादें कर्म (मंत्रतंत्रादिकांनीं) न्यून असले तरी निःसंशय पूर्ण होते ( इष्टफल देण्यास समर्थ होतें ), त्या स्वभावापासून कधींच च्युत न होणाऱ्या ब्रह्मरूप आत्म्याला मी ( ब्रह्मात्मज्ञानी ) मोठ्या आनंदानें साष्टांग नमस्कार करितों म्ह० आठ अंगांच्या आठ प्रकृतींसह त्यांत लीन होतो. ] १०१.

ह्याप्रमाणें आचार्यभक्त विष्णुशर्मकृत श्रीमच्छंकराचार्यकृत शतश्लोकीचें मराठी सान्वयार्थ विवरण समाप्त झालें.



ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ अध्याय—१ ला. भाग १ ला. [ मूळ सूत्र, सूत्रार्थ, शांकरभाष्य, चतुःसूत्रीपर्यंत रत्नप्रभा टीकेप्रमाणें भाषार्थाची योजना, भाष्यार्थ, पांचव्या अधिकरणापासून आनंदज्ञानांच्या टीकेच्या भाषांतरासह भाष्याचें स्पष्टीकरण व भाष्ययोजना, भामती व रत्नप्रभा टीकांतील आशय व्यक्त करणाऱ्या टीपा, प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका, आचार्य व बादरायण व्यास यांचीं चित्रें यांसह ] पृ. ८७२ किं. ५ रु. अध्याय २ रा, भाग २ रा. सदरहूप्रमाणेंच श्रीशंकराचार्यांचें चित्र पृ. ७२० किं. ४॥ रु. अध्याय ३ रा व चवथा, भाग ३ रा. वरीलप्रमाणेंच, श्रीप्रज्ञानन्दसरस्वतींचे सचरित्र छायाचित्र पृष्ठें ८८०, किं. ५॥ रुपये. सर्व ग्रंथांची किं. १५ रु.

## इतर पुस्तकें.

| | |
|---|---|
| शतश्लोकी ( श्रीशंकराचार्यप्रणीता -सान्वयार्थ[illegible] ) | [illegible]-० |
| सार्थ तैत्तिरीयोपनिषद् ( [illegible], भृगु ) | ०-१०-० |
| [illegible] .... .... | ०-११-० |
| आत्मपुराण अध्याय १-२-१० .... | ४- ४-० |
| अनुभूतिप्रकाश अ. १-२ .... .... | २- ०-० |

## दर्शनमाला.

| | |
|---|---|
| १ [illegible]सार ( सखंडन ) ... .... | ०-४-० |
| २ श्रीतर्कसंग्रहसार .... ... .... | ०-५-० |

इतर दर्शनें शिल्लक नाहींत. आचार्यकुल मासिकांत मूळासह सर्व दर्शनें सुरू होणार आहेत.

आचार्यकुल }
पुणें नं. २. }

विष्णुशास्त्री बापट
संचालक आचार्यकुल.